

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन



अनुक्रमणिका



# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ९ : अंक २ : उन्हाळा १९९१



अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६ / ४ एरंडवणे, पुणे ४११००४ (दूरध्वनी ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पाहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे/ प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

# पारायण की चिकित्सा ?

ज्ञानेश्वरी सप्तशताब्दीच्या निमित्तानं महाराष्ट्रातल्या सर्व मोठमोठ्या शहरांतून तिच्या सामूहिक पारायणाचे कार्यक्रम झाले. एका वेळेला हजारो भाविक एकत्र जमून सामूहिक पद्धतीनं ज्ञानेश्वरीचं वाचन करत आहेत, हे दृश्य खूपच विलोभनीय होतं. ज्यांना सामूहिक पारायणात सहभागी होता येत नव्हतं, त्यांनी आपापल्या घरी वैयक्तिक स्वरूपाची पारायणं केली. ज्यांना हेही शक्य नव्हतं, त्यांनी श्रोत्यांची भूमिका घेऊन ही पारायणं ऐकली. अशा तऱ्हेनं लोकांनी आपल्या मनातील ज्ञानेश्वरीबद्दलचा आदरभाव प्रकट केला. पारायण ही त्यांची, हा आदरभाव व्यक्त करण्याची प्रतीकात्मक कृती होती. पारायणानं आपण काही-तरी पवित्र कृत्य करत आहोत, अशीही त्यांची श्रद्धा होती. ज्ञानेश्वरी त्यांना कळत नव्हती, तरीही ते पारायणाला प्रवृत्त झाले होते.

पण पारायण म्हणजे ज्ञानेश्वरीचा अभ्यास नव्हे. पारायणातून एखादा त्या अभ्यासाला प्रवृत्त होऊ शकेल; पण म्हणून पारायण हे अभ्यासाला पर्याय होऊ शकत नाही. पण काही लोकांच्या मनात या संदर्भात गोंधळ असल्याचं जाणवतं. लोकानुरंजनाच्या भरात पारायणाचं कौतुक करता करता ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचं महत्त्व कमी लेखण्याची चूक त्यांच्याकडून घडत असते. अशा उत्साही व्यक्तींमध्ये प्रसिद्ध ज्ञानेश्वरीभक्त श्री. बाबामहाराज सातारकर यांची गणना होते. नुकतेच त्यांनी ‘ ज्ञानेश्वरीची फक्त पारायणं करा, चिकित्सा करू नका. चिकित्सेनं हाती काही लागत नाही. ” अशा तऱ्हेचे उद्गार काढले आहेत. बाबामहाराज हे नव्यानं सांगत नाही आहेत. आपल्या कीर्तन-प्रवचनांतून ते अनेक वेळा हेच सांगत असतात. हे सवंग लोकानुरंजन म्हणायचं, की प्रामाणिक श्रद्धाभाव म्हणायचा हे ठरवता येत नाही.

पारायण म्हणजे एखादा ग्रंथ उच्चारपूर्वक वाचून काढणं. तो वाचताना त्यातील प्रत्येक अक्षराचं उच्चारण झालेलं असावं, एवढाच आग्रह असतो. त्या ग्रंथाचा अर्थ कळलाच पाहिजे असा आग्रह नसतो. त्या ग्रंथाचं नुसतं उच्चारणच इष्टार्थप्राप्ती करून द्यायला समर्थ असतं, अशी श्रद्धा त्यामागे असते. म्हणजे त्या ग्रंथाला मंत्रपदवी प्राप्त झालेली असते. मंत्राच्या उच्चारणाला अतिशय महत्त्व असतं. त्याच्या अर्थाचा विचार करायची गरज नसते. आपल्या मध्ययुगीन वाङ्मयात अनेक ग्रंथांना अशी मंत्रपदवी प्राप्त झालेली दिसते. अशा ग्रंथांना प्रासादिक म्हणण्याची पद्धत आहे. गुरुचरित्र, व्यंकटेशस्तोत्र, रुक्मिणी-स्वयंवर ही त्यांतील काही उदाहरणं होत. अलिकडच्या काळातील गजाननविजय

ह्याही ग्रंथाची अशीच प्रसिद्धी आहे. वारकरी संप्रदायात ज्ञानेश्वरीला अशीच मंत्राची योग्यता प्राप्त झालेली आहे.

ग्रंथाचं वाचन म्हणजे ग्रंथ नीट मननपूर्वक वाचून, त्यातील प्रमेय नीट समजून घेणं होय. वाचनात मुख्य भर लेखकाचा अभिप्राय समजून घेण्यावर असतो. त्यामुळे ग्रंथातील अक्षरं उच्चारलीच पाहिजेत, असं बंधन त्यात नसतं. साक्षरतेच्या प्राथमिक अवस्थेत मोठ्यानं वाचणं ही गरज असली, तरी नंतरच्या विकसित अवस्थेत ती गोष्ट अडचणीची ठरते. वाचनाच्या प्रशिक्षणात मोठ्यानं वाचणं, मनात वाचणं, अक्षरांचा मागोवा घेत दृष्टी फिरवीत वाचणं, स्थिर नजरेनं वाचणं, कमीत कमी वेळात वाचणं असे वाचनाचे टप्पे मानले जातात. त्यांमध्ये शेवटी शेवटी अर्थावर लक्ष केंद्रित करून अवांतर विस्तार वगळून वाचणं असाही प्रकार असतो. कोणताही ग्रंथकार ग्रंथ लिहितो, तेव्हा त्याला उपलब्ध असलेल्या ज्ञानाची नीट व्यवस्था लावून, त्याच्या आधारानं स्वतःची प्रमेयं तो मांडत असतो. या मांडणीत उपलब्ध ज्ञानाची मांडणी अभिप्रेत असतेच. त्यामुळे त्या ग्रंथात निम्म्याहून अधिक भाग पूर्वोपलब्ध ज्ञानावरच आधारित असतो. चांगल्या वाचकाला हे पूर्वज्ञान अवगत असेल तर ग्रंथाच्या मांडणीवरूनच त्याला त्याचा अंदाज येतो. ते परत वाचण्याची त्याला गरजही नसते. तेव्हा ते वगळून, तो फक्त प्रमेयावर लक्ष केंद्रित करू शकतो. त्यामुळे त्याचा वाचनातील वेळ वाचतो. स्वामी विवेकानंद मोठमोठे ग्रंथ दोन-तीन तासात वाचून संपवत असत. तेव्हा या प्रकारच्या वाचनात ग्रंथातील अक्षर न् अक्षर वाचलंच पाहिजे, अशी गरज नसते. ग्रंथाचा गाभा कळणं हेच महत्त्वाचं असतं.

काव्यग्रंथांच्या बाबतीत वेगळीच परिस्थिती असते. तिथं नुसतं पारायण उपयोगाचं नसतं. किंवा नुसता कवीचा अभिप्राय समजून घेऊनही चालत नाही. कवीनं स्वतःचा अभिप्राय अधिक उत्कटतेनं, अधिक आनंददायक पद्धतीनं काव्यातून व्यक्त केलेला असतो. त्यामुळे तो समजण्यासाठी मूळ काव्य संपूर्ण वाचावंच लागतं. काव्यग्रंथात कवीचा अभिप्राय आणि त्याचा आविष्कार या दोहोंनाही महत्त्व असतं. काव्यग्रंथाचं वाचन आस्वादाच्या अंगानं व्हावं लागतं. ही प्रक्रिया केवळ पारायण किंवा वाचन यांच्यापेक्षा वेगळी असते. तिच्यामध्ये अभिप्राय आणि आविष्कार यांची सांगड घालत घालत कविकृत रचनेचा आनंद अनुभवायचा असतो.

ज्ञानेश्वरीत ही तिन्ही वैशिष्ट्यं एकत्रितपणे प्रकट झालेली आहेत. तो मंत्ररूप ग्रंथ आहे, अशी सर्व वारकऱ्यांची श्रद्धा आहे. त्याच्या केवळ श्रद्धापूर्वक वाचनानंच परमार्थसिद्धी होते, असं मानण्याकडे त्यांचा कल आहे. स्वतः ज्ञानेश्वरमहाराज गीतेकडे याच दृष्टीनं पाहतात. गीतेच्या अर्थग्रहणानं जे फळ जोडतं तेच तिच्या नुसत्या वाचनानं किंवा श्रवणानंही मिळतं असं त्यांनी वारंवार सांगितलं आहे. ज्ञानेश्वरांची गीतेसंबंधी जी समजूत आहे. तीच वारकऱ्यांची ज्ञानेश्वरीसंबंधी आहे.

पण ज्ञानेश्वरी अथवा गीता यांना ही मंत्रपदवी कशामुळे येते ? ती त्यांच्यांतील उदात्त तत्त्वज्ञानामुळे, विचारवैभवामुळेच ना ? ज्यांना हे तत्त्वज्ञान कळायची पात्रता नाही, विचार-वैभवाचं आकलन होणार नाही अशांना सुरुवातीला केवळ पारायण करा, हळूहळू तुम्हाला सर्व कळू लागेल, हे सांगण्यामागची भूमिका आपण समजू शकतो. पण तुम्ही केवळ पारायणच करा, असं सांगत राहणं म्हणजे या लोकांना त्या विचारवैभवापासून वंचित ठेवण्याचाच प्रकार आहे. पारायण हे ज्ञानाचं प्राथमिक साधन आहे, पर्याय नाही.

ज्ञानेश्वरांनी अर्थग्रहणाचं महत्त्व नाकारलेलं नाही, हेही लक्षात घेतलं पाहिजे. त्यांनी गीताप्रासादाचं जे रूपक केलेलं आहे त्या रूपकात गीतेचं पारायण करणारांना मंदिराच्या बाहेरून प्रदक्षिणा घालणारे असं म्हटलेलं आहे. श्रवण करणारांना मंदिरात बसून सावलीचा लाभ घेणारे असं म्हटलेलं आहे आणि अवधानपूर्वक अर्थग्रहण करणारांना मंदिराच्या गाभ्यात प्रवेश करून परमात्म्याला उराउरी आलिंगन देणारे असं म्हटलेलं आहे. यावरून अर्थज्ञानाला ते सर्वांत अधिक महत्त्व देतात, हे उघड आहे. आता या अर्थग्रहणाबरोबर पठन आणि श्रवण यांनीही मोक्षच मिळतो, असं ते सांगतात. ते अर्थवादात्मक आहे, हे आपण ओळखलं पाहिजे.

आता केवळ पारायणानं जर मोक्ष मिळाला असता आणि अर्थज्ञानाची त्याला काहीच आवश्यकता नसती तर ज्ञानेश्वरांना ज्ञानेश्वरी लिहिण्याचा खटाटोप करण्याची तरी काय गरज होती ? 'आपले मराठी बोल अमृतालाही मागे टाकतील. या ग्रंथात शांतरसाने शृंगाराच्या माथ्यावर पाय ठेवला आहे, मी माझ्या बोलांतून अरूपाचं रूप स्पष्ट करणार आहे.' इ. प्रतिज्ञा उच्चारून त्यांनी त्या पूर्ण करून दाखवल्या आहेत. त्या व्यर्थच का ? कारण केवळ पारायण करणारांना या सर्व खटाटोपाची काहीच किंमत नाही. ते त्याच्या-कडे लक्षही देणार नाहीत.

ज्ञानेश्वरीचं वैचारिक अंग अतिशय समृद्ध आहे. तिच्यात तत्त्वज्ञान आहे, नीतिविचार आहे, सामाजिक विचार आहे, स्वतंत्र जीवनदृष्टी आहे. उपासना–मार्गाचं विवेचन आहे; या प्रत्येक क्षेत्रात ज्ञानेश्वरीनं काहीतरी अभिनव देण्याचा प्रयत्न केलेला आहे. तो मराठी-तला तत्त्वज्ञानावरचा श्रेष्ठ आद्यग्रंथ आहे. वारकरी संप्रदायाचं उदारमतवादी तत्त्वज्ञान त्याच्याद्वारे प्रकट झालेलं आहे. या संप्रदायाचा तो आधारग्रंथ आहे. पारायणाचा उपयोग ग्रंथ टिकवण्यासाठी, त्याची स्मृती जागवण्यासाठी होतो. पण ग्रंथातील शिकवणुकीचा प्रसार होण्यासाठी त्याचं अर्थग्रहणच झालं पाहिजे. त्या अर्थाचं विवरण झालं पाहिजे. इतर ग्रंथांशी त्याची तुलना झाली पाहिजे. त्या ग्रंथात काही पूर्वज्ञान गृहीत धरलं गेलं असेल तर त्याचं निरूपण झालं पाहिजे. हे सर्व करणं याला चिकित्सा म्हणतात.





अनुक्रमणिका

काव्याच्या अंगाने आस्वाद घेतानाही चिकित्सेची गरज असते. ज्ञानेश्वरी हा उत्कृष्ट काव्यग्रंथ आहे. तिच्यामध्ये उदात आशय आणि मनोहर अभिव्यक्ती यांचा सुंदर मेळ झालेला आहे. त्याचा जर आस्वाद घ्यायचा असेल, तर या दोन्ही अंगांचा चिकित्सापूर्वक विचार झालाच पाहिजे.

चिकित्सा करण्यात कशाचीही हानी नाही. आज ज्ञानेश्वरीचा चिकित्सापूर्वक अभ्यास अनेक अंगांनी चालू आहे. कोणी तिच्या तत्त्वज्ञानाचा विचार करतो, कोणी तिच्यातील भक्तिमार्गाच्या विवेचनाचा अभ्यास करतो, कोणी तिच्यातील नीतिमार्गाचा शोध घेतो. कोणी तिचं व्याकरण तपासून पाहतो, तर कोणी तिची सामाजिक पार्श्वभूमी विचारात घेतो, कोणी तिचा काव्यग्रंथ म्हणून अभ्यास करतो, अशा विविध अंगांनी ज्ञानेश्वरीचे अभ्यास चालू आहेत. या अभ्यासांमुळे ज्ञानेश्वरीचं सौंदर्य उणावलं की तिच्या समृद्ध स्वरूपाचा नवीन साक्षात्कार झाला ?

अशी चिकित्सा नाकारून केवळ पारायणात समाधान मानायला शिकवणं म्हणजे समाजाला एका प्रकारच्या अज्ञानात राहायला सांगणंच होय. कुठलीही चिकित्सा न करता केवळ पारायणाची शिफारस करणं म्हणजे दिशाभूल करण्याचाच एक प्रकार होय. वेदांच्या अर्थाकडे लक्ष न देता त्याचं केवळ पाठांतर करायला सांगणारांना यास्कानं तीन हजार वर्षांपूर्वी जो इशारा दिला होता त्याचं स्मरण इथे होतं. यास्क म्हणतो, 'वेदाचं अध्ययन करून जो अर्थ समजून घेत नाही तो निव्वळ भार शिरावर घेऊन उभ्या राहिलेल्या खांबासारखा होय. पण जो अर्थ जाणतो, त्याला सर्व सुखं मिळतात. त्याचंच पाप ज्ञानानं धुतलं जाऊन तो स्वर्गाचा अधिकारी होतो.' ग्रंथाची खरी सेवा त्याला मंत्र-पदवी देऊन किंवा राजैश्वर्याच्या दिमाखात त्याचं मुद्रण करून दोन दोन हजारांच्या मखरात बसवण्यानं होत नसून सर्वसामान्य वाचकापर्यंत त्याच्या शिकवणुकीचा प्रसार करण्यातच आहे. त्यासाठी चिकित्सेचीच गरज आहे, यांत्रिक पारायणाची नव्हे.

कल्याण काळे

# नव्या मुला-मुलींच्या मराठीच्या विकासाची दिशा

आशा मुंडले

## प्राथमिक भूमिका

मराठीच्या प्रश्नांबाबत अनेक पैलू चर्चासत्राच्या निमंत्रणात विचारार्थ सुचवलेले आहेत. परंतु त्यांपैकी काही निवडून त्यांचा सखोल विचार करणे हा मार्ग मी निवडलेला नाही.

मी असे ठरवले, की मराठी भाषेचा तरुण उपयोजक डोळ्यांपुढे ठेवायचा आणि त्याच्या संदर्भात निरनिराळ्या पैलूंचा प्रारंभिक विचार करायचा. एकाच पैलूत खोलवर आणि सांगोपांग शिरण्यापेक्षा उठावाच्या नकाशाप्रमाणे प्रथम सर्वसाधारण आढावा घ्यायचा. व्याप्ती आणि उंचसखलपणा अर्थात खाचखळगे स्पष्ट करायचे.

प्रत्यक्ष निरीक्षण आणि मराठीवरचे माझे प्रेम यांतून हा निबंध आकाराला आला. भाषाव्यवहार माणसाच्या जिव्हाळ्याचाही असतो. सिद्धांत आणि कृती यांत मेळ राखूनच वस्तुस्थिती बदलता येते, असा माझा विश्वास आहे.

आज तज्ज्ञ आणि सामान्य माणूस एकत्र येऊन संघटित भाषाविषयक कृती करताना दिसत नाहीत. धोरण " वरून " ठरते. ते कसे ठरते आणि का याची माहिती सामान्य उपयोजकाला तर नसतेच; परंतु तज्ज्ञांपर्यंतही हे ज्ञान पोचत नाही.

प्रसारमाध्यमातून आणि व्यासपीठावरून ज्या भूमिका आवेशाने मांडल्या जातात, त्या अनेकदा अज्ञानावर आधारित असतात. त्या परस्परविरोधी असल्याने सामान्य माणूस बुचकळ्यात पडतो आणि आपले मत ठरवताना आणि कृती निवडताना उपलब्ध सोय आणि फायद्याचा अंदाज घेऊन वागतो.

नव्या मुलामुलींचे मराठी हा विषय चिंतेचा जेव्हा वाटतो, तेव्हा आपल्या डोळ्यांपुढे मुख्यत्वे पालकांनी इंग्रजी माध्यमाच्या शाळेत लहानपणापासून अडकवलेली मुलेच असतात.

निरीक्षणानंतर असे आढळले, की पालकांचे पूर्वग्रह आणि शालेय शिक्षणात मराठीची समाधानकारक जोपासना नाही, याची ही मुले बळी आहेत.

काही पालकांना वाटते, मुलांचे इंग्रजी सुधारावे, यासाठी त्यांच्याशी बालपणापासून घरीदारी इंग्रजीत बोलावे. पालकांचे इंग्रजीवर प्रभुत्व पुरेसे नसल्याचा तोटा तर या मुलांना होतोच. पण शिवाय भावनात्मक खुरटलेपणा येतो. इंग्रजी आणि मराठी यांपैकी कशातच पुरेशी रुजवण होत नाही. पण भावी आर्थिक आयुष्याचा विचार करून इंग्रजीशी शेवटी जमवून घेतले जाते.

तोपर्यंत किशोरवयात, पौगंडावस्थेत अनेक ताण सोसावे लागतात. उपमन्यु चतर्जींच्या 'इंग्लिश ऑगस्ट' या कादंबरीचा नायक प्रातिनिधिक म्हणायला हरकत नाही. तो मराठी नाही. पण इंग्रजी माध्यमामुळे झालेले त्याचे परात्मीकरण भारतातील सर्व प्रदेशात आढळणारे आहे.

वास्तविक ही दुर्दशा टाळता आली असती. मराठीची अभिवृद्धी करायची याचा अर्थ मराठीसाठी मोठी स्वतंत्र संस्था काढून खूप खर्च करायचा असा नाही. हवा, पाणी, अन्न, निवारा, वस्त्र यांच्याप्रमाणेच भाषा सर्वंकष आहे आणि शिवाय या सर्वांहून वेगळा असा मानवी चैतन्याचा स्पर्श तिला आहे.

तेव्हा जिथे जिथे भाषा वापरली जाते, तिथे तिथे मराठीला उचित स्थान दिले, की मराठी आपोआपच रुजेल— इथे राहणाऱ्या सर्वांच्याच मनात.

त्यासाठी पहिले ठोस पाऊल म्हणजे आधुनिक शास्त्रीय ज्ञानावर आधारित असे शैक्षणिक धोरण. त्याचा पहिला दंडक असा, की लहान मुलांना पूर्वप्राथमिक आणि प्राथमिक शिक्षण इंग्रजीतून नको. अपवाद फक्त येथल्या काही अँग्लो-इंडियन कुटुंबांचा करता येईल. कारण खरोखरच त्यांची मातृभाषा इंग्रजी आहे. तरी सुद्धा व्यापक हिताच्या दृष्टीने तशा शाळांतूनसुद्धा मराठी ही दुसरी भाषा म्हणून हवीच.

वास्तविक महाराष्ट्रातील आम जनतेने रस्त्यावर येऊन संयुक्त महाराष्ट्राची चळवळ केली. झुंज दिली. तेव्हापासून म्हणजे १९६० पासूनच धोरण योग्य असते, तर आज चिंता वाटली नसती आणि इनर्शिया आणि इंग्रजी चालवून घेण्याचा तीस वर्षांचा इतिहास यांमुळे जे नवीन प्रश्न आता तयार झाले ते झाले नसते. अजूनही खंबीरपणाने परिस्थिती बदलता येईल.

मराठीला उत्तेजन म्हणजे मराठी वृत्तपत्रे, पुस्तके, चित्रपट हे सर्व लोकांना परवडेल अशा किमतीत देणे. अनौपचारिक प्रौढ शिक्षणाद्वारे नवा वाढता ग्राहक या गोष्टींना आहे. त्याची आर्थिक ताकद विचारात घेऊन तगाई देऊन किमती हव्यात. भाषेची जोपासना शेतीच्या जोपासनेइतकीच महत्त्वाची आहे. हे उत्तेजन फक्त ललित वाङ्मयाला नको. समाजशास्त्रीय व इतर वैचारिक वाङ्मयालाही हवे. कारण भाषेबद्दलची समाजाची मनोभूमिका त्यातून घडेल.

अनुवाद हे आणखी क्षेत्र. मराठी भाषकांनी मराठीतून इतर भारतीय भाषांत एकोणिसाव्या शतकापासूनच्या आपल्या सामाजिक विचारांचे लोण पोचवले पाहिजे. आपण प्रगत कसे व का आहोत ह्याचा परिचय झाला, तर अ-मराठी भाषकांना महाराष्ट्राबद्दल, पर्यायाने मराठीबद्दलही आदर, आपुलकी वाटेल. ती शिकावीशी वाटेल.

"बंगाल"ची प्रतिमा स्वातंत्र्यपूर्व काळात अनुवादातून पोचल्यामुळे अनेकजण बंगाली शिकले. तसेच मराठीचेही प्रयत्नाअंती होऊ शकेल.

फक्त प्रमाण मराठीतून लिखाण न छापता प्रमुख बोलीतून सुद्धा छापायला उत्तेजन द्यावे.

मराठी शिकणे व वापरणे "भयंकर अवघड" वगैरे नसून ते प्रयत्नांती मर्यादित वेळात येईल, हे आपण सिद्ध करून दाखवले पाहिजे.

माझा अनुभव असा आहे, की रशियन, जर्मन, इंग्रज माणसे एक वर्षांत उत्तम मराठी शिकतात. मग ते अर्थातच भारतीयांना येईलच. १९६६ पासून मी सतत परदेशी माणसांना आणि परप्रांतीय भारतीयांना मराठी शिकवले आहे.

प्रश्न शासनात नवा दृष्टिकोन-विशेषतः शासनाच्या शैक्षणिक धोरणात आणण्याचा आहे; आणि त्यासाठी व्यापक लोकमत तयार करीत राहण्याकडेही तज्ज्ञांनी वेळ आणि लक्ष दिले पाहिजे.

## निरीक्षणातून दिसलेली सुरुवात

मराठीचे भवितव्य काय याचा विचार करताना आपल्या डोळ्यांपुढे मुख्यत्वे प्रौढ माणसं असतात. साधारण ३० ते ६० वयाची. याचं कारण असं, की या माणसांच्या कानांवर संयुक्त महाराष्ट्राची चळवळ बऱ्यापैकी पडलेली आहे. आज ४० किंवा त्याहून जास्त वयाच्या माणसांपैकी काहींचा तिच्यात सहभाग होता. शिवाय या वयोगटातील बहुतेक माणसांचे शिक्षण मराठीतून झालेले आहे. मराठी वाङ्मयाशी त्यांचा परिचय आहे. माधव ज्यूलियन यांची 'मराठी असे आमुची मायबोली' ही कविता, 'बहु असोत सुंदर' हे महाराष्ट्र राज्याचे अधिकृत गीत, फडके, खांडेकर, गडकरी वगैरे वगैरे त्यांची श्रद्धास्थानं आहेत. आणि सर्वांत महत्त्वाचं म्हणजे मराठीची बाजू घेणे हे आपले कर्तव्य आहे, असे त्यांना वाटते. मात्र भाषाव्यवहाराच्या सामाजिक ज्ञानाची शास्त्रीय बैठक असलेली माणसं आणि हा बहुसंख्य मराठीप्रेमी शिक्षित गट यांच्यांत विचारांची देवाणघेवाण जवळजवळ नाहीच.

त्यामुळे त्यांच्या याबाबतच्या कल्पना "शुद्ध भाषा", "सावरकरांची शब्दनिर्मिती", "संस्कृत आणि इंग्रजी याबद्दल भययुक्त आदर, पण एकंदरीने त्यात प्रावीण्य कमीच आणि यातून आलेला न्यूनगंड" यांच्यावर आधारित असू शकतात.

६० वर्षे वयानंतरच्या माणसांचा विचार मी करत नाही. कारण नव्या पिढीचे दूरगामी भवितव्य ठरवणे किंवा त्यावर परिणाम घडवणे अशा प्रकारचा त्यांचा प्रभाव नव्या पिढी-वर अजिबात नाही.

पण या आधीच्या पिढीला वाटते, की फाडफाड इंग्रजी न आल्याने बुद्धी, कर्तृत्व असून आपण मागे पडलो किंवा आपली प्रसिद्धी झाली नाही, आणि पुढच्या पिढीत ही चूक स्वतःच्या मुलांबाबत दुरुस्त करण्याचा त्यांचा निर्धार आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळांच्या आत्मगौरवाला आलेली सूज या वर्गाच्या पालकांकडून आलेली आहे हे निश्चितच.

परंतु गंमत अशी, की आपली वैयक्तिक मुलेबाळे (त्यातले त्यात मुलगे-मुलींबाबत

तितका आग्रह नाही.) सोडल्यास इतर सर्वांनी मराठीतूनच शिकावे, मराठीची अभिवृद्धी करावी, मराठीत कारभार व्हावा, गोव्यात मराठी हवी, बेळगाव मिळालेच पाहिजे वगैरे मते यांची असतात.

त्यामुळे जे नव्याने शिक्षित होत आहेत, त्यांनी मुले इंग्रजी माध्यमात घातली, की यांच्या मनात अस्वस्थता येते.

तेव्हा ज्यांच्या घरात तीन-चार पिढ्या शिक्षित आहेत, अशा गटाची ही मानसिक अवस्था त्यांच्या पुढच्या पिढीवर निश्चित परिणाम करते आहे.

पालकांच्या आग्रहाने इंग्रजी माध्यमातून शिकणाऱ्या मुला–मुलींचे मराठी मी पुष्कळदा मनःपूर्वक ऐकते. त्याचे थोडेसे वर्णन पुढे देत आहे. पण वर्णन करणे हा या लेखाचा हेतू मात्र नाही. पण या पिढीचे वर्तन आणि आकांक्षा लक्षात न घेता प्रभावी मराठीचे धोरण आखता येणार नाही, असे मात्र मला ठामपणे वाटते.

## इंग्रजी माध्यमातून शिकलेली तरुण मुले–मुली.

एकमेकांमध्ये ही इंग्रजीतून बोलतात. परंतु ते हिंदी आणि इतर देशी शब्द मुक्तपणे इंग्रजी वाक्यरचनेत वापरतात. नुसती नामेच नाही तर कधीकधी क्रियापदे आणि विशेषणे सुद्धा. "आय चढाओऽड हिम अँड गॉट इट इन" हा एक नमुना. पालकांशी ते पालकांच्या इच्छेनुसार इंग्रजीत किंवा पालकांचा आग्रह असला, तर मराठीत बोलतात. मुलांपेक्षा मुलींचे मराठी तुलनेने विशेषतः लग्नानंतर अधिक सुधारते असे आढळले. कारण शिक्षण चालू असताना जरी संपर्क इतर इंग्रजी माध्यमातल्या विद्यार्थ्यांशीच आला, तरी नंतर नातेवाईक, शेजारीण, घर चालवताना भेटणारी माणसे यामुळे मराठीचा वापर वाढवावाच लागतो. तसे न करता तरुण पुरुषांचे चालून जाते. ते इंग्रजीवरच भिस्त ठेवतात.

फर्ग्युसनमधील काही विद्यार्थी तर म्हणाले, की इंग्रजी माध्यमातून शिकणारी आणि मराठी माध्यमातून शिकणारी अशा दोन नव्या जातीच उदयाला येत आहेत आणि पुढे जर त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार अजिबात थांबला, तर त्यांना आश्चर्य वाटणार नाही.

सर्वच नव्या मुलामुलींना ही परिस्थिती आवडते असे मात्र मुळीच नाही. पण याला काय इलाज, अशी अगतिक भूमिका जास्त दिसली. मराठी माध्यमातल्या मुलांना ही नवी मुले शिष्ट, श्रीमंत आणि प्रिव्हिलेज्ड वाटतात. पण ती मुले स्वतःला मात्र अगतिक, साशंक आणि काहीतरी गमावलेली समजतात. अगदी थोडा गट मात्र बिनधास्त आहे. स्वतःला श्रेष्ठ समजतो. पण बहुधा याला त्यांच्या पालकांची प्रतिष्ठा व पैसा हे कारण असलेले आढळले.

या मुलांना आईबापांपासून, महाराष्ट्रापासून एवढेच नव्हे, तर भारतापासूनच दूर पळायचे आहे. पण इतर इंग्रजी माध्यमातल्या मुलांना दोन्ही डगरींवर हात ठेवायचा आहे.

मला या मुलांशी मोकळी चर्चा करता आली, याचे मुख्य कारण माझ्या मुलांमुळे माझा



अनुक्रमणिका

अनेकांशी असलेला परिचय हे आहे. पण त्यापेक्षा महत्त्वाचे कारण म्हणजे माझे इंग्रजी घाटी/गावठी नाही, याची त्यांना अनुभवाने पटलेली खात्री.

बोली इंग्लिशवर उत्तम प्रभुत्व नसलेल्या जुन्या पिढीच्या माणसांशी ही पिढी नीट संवादच साधत नाही, अशी तक्रार मला सर्वच मोठ्या वयाच्या माणसांकडून आढळली.

माझे मत मात्र या मुलांना मदत हवी आहे, असे झाले आहे.

ती देण्यासाठी प्रथम भाषाव्यवहाराची सध्याची स्थिती थोडीशी तपशीलाने पाहू, व नंतर उपायांकडे वळू या.

## भाषाव्यवहाराचे स्वरूप आणि प्रचलित समजुती

भाषाव्यवहाराचे दोन प्रमुख विभाग आहेत. एक, औपचारिक अथवा जाणीवपूर्वक. आणि दोन, अनौपचारिक अथवा सहज. शाळेत शिकवताना, कार्यालयात काम करताना, व्यापारातील करार करताना, न्याय देताना, वगैरे क्षेत्रात प्रमाण भाषेचा लेखी आणि तोंडी उपयोग होतो. तेथील प्रत्येक शब्दाशब्दाला महत्त्व असते. जर वादविवाद उत्पन्न झाले तर निर्णय घेताना तार्किक संगती आणि बुद्धी यावर आधारित अर्थ मान्य केले जातात. विशेषतः कोणत्याही कराराचे आणि कायद्याचे पालन करताना हे विशेष लक्षात येते. तुम्हांला अमुक लायसेन्स दिले आहे किंवा तमुक जागा भाड्याने दिली आहे, अशा वाक्यांचे अर्थ लक्षात घेऊन नवी वस्तुस्थिती अस्तित्वात येते. भाषेचा हा फार महत्त्वाचा उपयोग आहे.

जाणीवपूर्वक उपयोगाचा एक दुसरा महत्त्वाचा क्षेत्रपट्टा आहे. तो म्हणजे वाङ्मय-निर्मिती. लोकवाङ्मय असो, की विशिष्ट व्यक्तीकडून निर्मित असो, वाङ्मयाचे वैशिष्ट्य असे, की त्याचे टेक्स्ट ठरलेले असते. त्यातील शब्दांची फेरफार करणे अयोग्य ठरते.

अर्थातच ही दोन्ही जाणीवपूर्वक क्षेत्रे शंभर टक्के औपचारिक मात्र नसतात. जेथे जेथे मानवी व्यवहार आहेत, तेथे तेथे सीमारेषा धूसर असतात आणि अनौपचारिकपणाचा प्रवेश होतो. एखादा नट पदरची वाक्ये प्रयोगात घुसडतो, एखाद्या लोकगीताचे पाठभेद प्रचलित असतात, एखाद्या करारात मुद्दाम अंधुकता ठेवली जाते आणि त्या संदिग्धपणाचा फायदा अनौपचारिक निकषांप्रमाणे घेतला जातो. राजकीय पक्षांनी असा नवा शब्दप्रयोग अलीकडेच निर्माण केला आहे : " मैत्रीपूर्ण लढत "

परंतु सर्वसाधारणपणे औपचारिक भाषाव्यवहाराची वैशिष्ट्ये :

१) तो हेतुपूर्वक नेमका असतो.

२) व्यक्तिविशिष्ट नसतो. म्हणजे उदाहरणार्थ, मंत्रिपदाची शपथ सर्वांना सारखीच. फक्त मी करतो/करते एवढा लिंगबदल त्यात दिसतो.

३) पूर्वीच्या औपचारिक व्यवहाराला धरून पुढची वागणूक, कृती व्हावी, अशी सर्व संबंधितांची अपेक्षा असते.

४) शक्यतो या व्यवहाराचे महत्त्वाचे अंश लेखी स्वरूपात अथवा ध्वनिमुद्रित करून जतन केले जातात. ते नंतर संदर्भ किंवा पुरावा म्हणून वापरले जातात.

दुसऱ्या प्रकारचा भाषाव्यवहार म्हणजे अनौपचारिक. हे म्हणजे आपलं नेहमीचं बोलणं. एकमेकांशी, अपरिचित व्यक्तीशी किंवा परिचितांशी. याचा मुख्य हेतू संवाद साधणे हाच असतो. आणि भावनात्मक आशयाला यात फार महत्त्व असते. आपलं म्हणणं दुसऱ्यानं ऐकावं, त्याला प्रतिसाद द्यावा, हे तर अपेक्षित असतंच. पण याशिवाय आपल्याला समजावून घ्यावं, आपुलकी दाखवावी किंवा तशी परिस्थिती असल्यास शत्रुत्व दाखवावं, अशाही अपेक्षा असतात. आवाजाचा चढउतार, हावभाव, चेहऱ्यावरचे फेरफार आणि न बोललेले पण सूचित केलेले शब्द यांच्या सहाय्याने अशा संभाषणात आशयाची वृद्धी केलेली असते व प्रतिसाद देताना याचही विचार होतो. इथे हे पण लक्षात घेतलं पाहिजे, की ऐकून दुर्लक्ष करणे किंवा प्रत्युत्तर न करणे हाही प्रतिसादच आहे.

माझ्या या प्रतिपादनावरून आपल्या आपोआप लक्षात येईल, की मराठीची पीछेहाट होते आहे, तिच्यावर अन्याय होतो आहे वगैरे हाकाटी तिच्या औपचारिक क्षेत्राबद्दलच प्रामुख्याने आहे. मराठी भाषकांपैकी बहुसंख्य माणसे निरक्षर आहेत आणि आजही ते मराठीतून व्यवहार करतात. याशिवाय साक्षरांमधे सुद्धा बहुसंख्य घरातून मराठीतच अनौपचारिक क्षेत्रातले भाषाव्यवहार होतात. अधूनमधून इंग्रजी शब्दांचा वापर केला गेला तरी त्यामुळे मुळ बैठक मराठी आहे, हेच निदर्शनास येते. जे थोडे बहुत इंग्रजी वापरले जाते ते मराठाळलेले असते. 'यू नो ही अॅग्रीज मी नॉट अॅट ऑल.' (तुला माहीत आहे, त्याचं माझं मुळीच पटत नाही.) 'व्हाय आस्क अगेन अगेन!' (पुन्हा पुन्हा काय विचारतेस!)

## भाषांचे सर्वेक्षण

या ठिकाणी थोडे विषयांतर करून मी एक महत्त्वाची सूचना जनगणना खात्याला करू इच्छिते. मराठी भाषा बोलणारे भारतीय नागरिक किती, त्यांतील किती जणांची मराठी ही पहिली भाषा आहे, या आकडेवारीबरोबरच त्यांतले किती जण मराठीत साक्षर आहेत, याचीही नोंद अभ्यासकांना जरुरीची वाटते. साक्षरतेचे प्रमाण मोजताना ते भाषेवर आधारित न मोजल्याने वस्तुस्थिती अस्पष्ट राहते. तसेच साक्षरता मोजताना १४ वर्षांखालील व १४ वर्षांवरील असेही निर्देशन हवे. कारण १५ वर्षानंतरही जो निरक्षर राहतो तो प्रौढ शिक्षणाचा गट. माणूस एकापेक्षा आधिक भाषांत साक्षर असला तर त्याची नोंद हवी. मराठीच नव्हे, तर सर्वच भाषांसाठी या प्रकारची प्राथमिक माहिती हवी. ग्रिअर्सननंतर म्हणजे १९२७ नंतर खऱ्या अर्थाने भारतीय भाषांचे सर्वेक्षण झालेलेच नाही, ही मोठी उणीव आहे आणि सुबद्ध आर्थिक नियोजनाच्या, शैक्षणिक नियोजनाच्या मार्गात अडथळा आहे. जनगणनेला जोडून किंवा स्वतंत्रपणे विस्तृत भाषिक सर्वेक्षण आवश्यक आहे.

## औपचारिक भाषा व्यवहार क्षेत्र

पहिल्या म्हणजे औपचारिक क्षेत्रातल्या परिस्थितीबद्दल जी तक्रार आहे, ती त्यातल्या वाङ्मय या उपविभागाबद्दल नाही. मराठीत भरपूर निर्मिती होत आहे. उलट पुस्तके तयार पण प्रकाशक मिळत नाहीत, अशीच परिस्थिती आहे. जे छापले जात नाही ते हौसेने तोंडीच लोकांपर्यंत पोचवले जात आहे. नवकवींचे संमेलन पाहिले म्हणजे वाङ्मयनिर्मिती थांबण्याची भीती अगदी नष्ट होईल. कारण हे तर सहज मान्य व्हावे, की ललित वाङ्मयाच्या सर्व प्रकारांत कविता हा सर्वांत आत्मलक्षी प्रकार.

औपचारिक भाषाव्यवहाराच्या ज्या क्षेत्रांबद्दल मुख्य तक्रार आहे, ती म्हणजे शिक्षण, न्यायदान आणि शासनव्यवहार. त्या क्षेत्रांकडे क्रमाक्रमाने पाहू. त्याआधी प्रथम हे पाहू, की तक्रारीचा पाया कोणता? तर वरच मी सांगितल्याप्रमाणे भारताच्या लेखी संविधानात मराठीला प्रमुख भाषेचा दर्जा आहे. आणि त्याला अनुसरून आकाशवाणी, दूरदर्शनमधे ती प्रसारणाची भाषाही आहे. तसेच केंद्र सरकारशी त्या भाषेत जर पत्रव्यवहार केला, तर उत्तर मिळेल. अर्थात उत्तर इंग्रजीत किंवा हिंदीतही चालेल. प्रशासकीय परीक्षा त्या भाषेतून देता येतात आणि इतकेच नव्हे, तर महाराष्ट्रात काम करणाऱ्या केंद्राच्या अधिकाऱ्यांना मराठी शिकवण्यासाठी व्यवस्था आहे. कोणताही राष्ट्रीय वाङ्मयीन इत्यादी पुरस्कार असला तर त्यात मराठीलाही स्थान असते. नॅशनल बुक ट्रस्टतर्फे मराठीत इतर पुस्तके भाषांतरित होतात वगैरे वगैरे. तसेच रेल्वेनेही स्थानकांवर मराठीत वगैरे सूचना ठेवल्या आहेत. म्हणजे मराठीसाठी केंद्रसरकार जे वैध आहे ते करीत आहे.

आता राज्य सरकार. इथे १९६० साली महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले. एकभाषिक राज्यासाठी त्यापूर्वी राजकीय संघर्ष झाला. त्या संघर्षाचे दक्षिण टोक अजूनही भिजत पडले आहे. राज्याची राज्यभाषा मराठी अधिकृतपणे ठरली. तेव्हा मग जबाबदारी निर्माण झाली की शिक्षण, न्यायदान आणि प्रशासकीय कारभार सर्व पातळ्यांवर मराठी माध्यमातून व्हावा. आणि अर्थातच जर ज्यांना ते कळायला पाहिजे, त्यांना मराठी येतच नसले, तर इंग्रजी-हिंदी भाषांतर किंवा माध्यम उपलब्ध असावे.

परंतु प्रत्यक्षात असे घडवण्यासाठी प्रयत्न झालेच नाहीत. लोकमान्य टिळक ज्याप्रमाणे इंचाइंचाने स्वराज्याची मागणी दामटत राहिले, त्याप्रमाणे मराठी इंचाइंचाने प्रभाव वाढवत राहिली आणि इंग्रजी हीच भाषा पूर्वीप्रमाणे वापरात राहिली. तेव्हा प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे, की मराठीच्या सर्वंकष वापरातला अडथळा येथल्या अ-मराठी भाषकांचा नसून येथल्या महाराष्ट्र राज्याच्या सेवेतल्या इंग्रजीत काम करायला सरावलेल्यांचा आहे. आपली मातृभाषा मराठी असली तरी "नेमका" अर्थ आपण इंग्रजीतूनच व्यक्त करतो, असे यांना वाटते.

उच्च शिक्षण देणारे व घेणारे बुद्धिजीवी यांतच येतात. बुद्धिजीवी म्हणजे इंटलेक्चुअल नव्हेत– तर हातापायाऐवजी डोक्याचे कष्ट, कामाठी करणारे. हेच बुद्धिजीवी मोठ्या

संख्येने आपल्या बालकांनाही प्रथमपासून इंग्रजीत ढकलत आहेत.

प्रशासकीय व्यवहारात आणि न्यायदानात इंग्रजीचा वापर कमी करून मराठी वाढवण्याकडे कल आहे. विधिमंडळात तर मराठीच वापरली जाते. परंतु शिक्षणात मात्र पूर्वी जी मुले मराठी माध्यमातून शिकली असती, ती इंग्रजीकडे वळत आहेत. आणि उच्च शिक्षणात तर पर्यायी माध्यम म्हणूनसुद्धा ज्यात मराठी नाही, अशा अनेक ज्ञानशाखा आहेत. अशा परस्परात अंतर्विरोध असलेल्या धोरणांमुळे इंग्रजीचे समर्थक आणि मराठीचे समर्थक यांच्यात जणू काही लढाईच चालू असते.

दुर्दैवाने जे "इंग्रजी" वापरले जाते, त्याची गुणवत्ता मात्र शंकास्पद आहे. आणि अधिकृत तयार मसुदे पाहिले, तर विचाराचा भोंगळपणा व संदिग्धता राखण्यासाठी इंग्रजी वापरले जाते का, अशी शंका येण्याइतपत चुका आढळतात. आकाशवाणीवर इंग्रजीतून चर्चा करू पाहणारे मराठी विद्वान जरूर ऐकावेत. विनोदी प्रकार असतो. तोच प्रकार विद्यापीठातील परिसंवादातही आढळतो.

तेव्हा मराठीचा वापर औपचारिक क्षेत्रात कूर्मगतीने वाढतो आहे पण त्यापैकी शिक्षणक्षेत्रात मात्र कमी होतो आहे, असे चित्र दिसते.

## अशासकीय औपचारिक क्षेत्र

अ–शासकीय औपचारिक क्षेत्रात व्यापारामधे मात्र चित्र वेगळे आहे. उद्योजक आणि व्यवस्थापन यांची मूळ पार्श्वभूमी कोणतीही असली, तरी कनिष्ठ सहकाऱ्यांशी चांगले औद्योगिक संबंध रहावेत आणि ग्राहकामधेही आपुलकी वाढावी, यासाठी येथे मराठीचा वापर वाढतो आहे. मात्र तो तोंडी व्यवहारातच वाढतो आहे. लेखी व्यवहार इंग्रजीतून होतात, की नाही ते उलाढाल केवढी आणि कोणत्या ग्राहकांसाठी यावरून ठरते. उच्चभ्रूंची किराणा दुकाने इंग्रजीतून बिलं इ. करतात. यात आश्चर्य काही नाही. व्यापारी हा भाषाव्यवहाराचा समाजमान्य नियंत्रक नाही. तो परिस्थिती स्वीकारून अर्थव्यवहार सांभाळणारा घटक आहे.

वरील विवेचनावरून लक्षात येईल, की मराठी भाषेचा सर्वंकष उपयोग करायला मुख्य अडथळा बुद्धिजीवी वर्गाकडूनच आहे. त्यातही शिक्षण क्षेत्राशी संबंधितांकडून अधिक. याची खोलवर रुजलेली सांस्कृतिक, मानसिक आणि आर्थिक कारणे आहेत.

ती आता क्रमाक्रमाने थोडक्यात पाहू या :

१) सर्वांना उत्तम मराठी आले आणि मराठीतूनच शिक्षण, न्यायदान व शासनव्यवहार झाला, तर स्पर्धा वाढेल आणि आपली जवळजवळ १९ व्या शतकापासून चालत आलेली नोकरी आणि निर्णयाची सत्ता या दोन्ही क्षेत्रांतली "प्रिव्हिलेज्ड पोझिशन" संपुष्टात येईल.

इतकेच नव्हे, तर सामान्यांना जे इंग्रजी कळत नाही, त्यामुळे झाकून राहिलेली अकार्यक्षमतेची, अज्ञानाची किंवा आळस नावाच्या भ्रष्टाचाराची मूठ उघडी पडेल. इंग्लंडमध्ये जसा "ओल्ड बॉईज" म्हणजे ऑक्सफर्ड-केंब्रिज पदवीधरांचा एकमेकांशी परिचित हितसंबंधी गट वर्चस्व ठेवून होता, तितकाच घट्ट पण शिक्षणाबरोबरच जात, धर्म, पैसा इत्यादींनीही मजबूत केलेला गट इथे १९४७ पर्यंत नक्कीच होता. आता ती पकड ढिली आहे, पण नाही असे नाही.

२) दर्जा खालावेल ही मानसिक भीती इतिहासात रुजलेली आहे. फार पूर्वीपासून इथे अशी मानसिकता आहे, की संस्कृत म्हणजे देवभाषा. पुढे इंग्रज आल्यावर त्यांनी इंग्रजीचा धाक दाखवला.

भारतात राजकारभाराची भाषा अरबी-फारशी होती. इंग्रजांच्या पूर्वी पण महाराष्ट्रात शिवाजीपासूनच मराठीला मानाचे स्थान मिळाले व संस्कृत-इंग्रजींबद्दल जरी तुलनेने न्यूनगंड वाटला, तरी तसा तो अरबी-फार्सीबद्दल निर्माणच झाला नाही. या दोन भाषा मात्र त्यातले नैपुण्य कमी झाले, तर आपण कुठे तरी मागे पडू असा ग्रह अनेकांच्या मनात निर्माण करीत आल्या आहेत व तो ग्रह तथाकथित वैचारिक लेखनातून पण जोपासला जातो.

"प्राकृत काय चोरापासून आली" म्हणणाऱ्या संतांची लढाई अजून आपण हरतोच आहोत.

३) आंतरराष्ट्रीय पातळीवर इंग्रजी आहे ते आधीच आपल्याकडे रुजलंय ते घालवायचं कशाला ? अनेकांना हे अगदी निर्णायक आर्ग्युमेंट वाटतं.

गंमत अशी, की इथे इंग्रजी रुजलेले नसून अजून वरवरच आहे. आणि दुसरे म्हणजे रशियन, चिनी, जपानी, फ्रेंच, जर्मन इत्यादी भाषांवर आपले पुरेसे प्रभुत्व नसल्याने आंतरराष्ट्रीय क्षेत्रात आपले नुकसान होतेच आहे.

४) इंग्रजी जपतच राहिलं, की आपण हिंदीतून बचावले जाऊ असंही अनेकांना मनापासून वाटतं. दक्षिणेकडील राज्यांइतका तीव्र हिंदीविरोध महाराष्ट्रात नसला, तरी हिंदीबद्दल ती भाषा मराठीइतकी प्रगत, वैभवशाली वगैरे नाही, असा ग्रह सर्रास आढळतो.

## भाषेबद्दलची जनमानसातली प्रतिमा

"मराठी"च्या प्रेमाने भावनिक आवाहन करणारा एक मोठा वर्ग आता पुढारीपण करू पाहणाऱ्यांच्यात दिसतो. त्यांचा हेतू हे प्रेम व्यक्त करून जास्त व्यापक पायावर लोकप्रियता मिळवण्याचा आहे. पण आवाहन करणाऱ्यांना स्वतःला संशोधन करणे जरी शक्य नसले, तरी भाषाशास्त्रज्ञांशी संपर्क राखून भाषाव्यवहाराबद्दल प्राथमिक ज्ञान मिळवता येईल. तसे केल्याने त्यांचे आवाहन म्हणजे निवळ आरडाओरडा न राहता अंमलबजा-

वणीचे मार्ग सोपे होतील. पण तसा प्रयत्न जवळजवळ मुळीच होत नाही. भाषेबद्दलच्या चालत आलेल्या रोमँटिक कल्पना आणि प्रदेशप्रेमाशी भाषेची घातलेली सांगड एवढ्या-वरच अवलंबून राहिले जाते.

रोमँटिक कल्पनांचे थोडेसे उदाहरण :

१. संस्कृत सर्व भाषांची जननी आहे.
२. मराठी भाषेवरचे प्रेम, म्हणजे आईवरचे प्रेम. ते न करणारा म्हणजे नमकहराम वगैरे. गंमत अशी, की भाषेच्या प्रेमामधे बापाची आठवण होत नाही. या सामा-जिक वास्तवाचा भयानकपणा यांच्या लक्षातसुद्धा येत नाही.
३. खायचे दात वेगळे आणि दाखवायचे वेगळे. आपल्या स्वतःच्या मुलांना इंग्रजीत पढवायचे.

मराठीवर प्रेम करणारा दुसरा वर्ग आहे. मराठीचे शिक्षक आणि प्राध्यापक. यांच्या प्रेमाचे कारण उघडच आर्थिक आहे. परंतु यात एक मानसिक द्वंद्व पण आहे. आपल्याला पुरेसे सफाईदार इंग्रजी येत नाही, याची खंत पण व्यक्त होताना दिसते. आपले विचार भाषांतर किंवा समीक्षा या मार्गांनी इंग्रजीपर्यंत पोचले, तर प्रतिष्ठा वाढेल असे त्यांना वाटते.

काही थोडे तळमळीचे विद्वान अभ्यासक आणि समाजशास्त्रज्ञ मराठीवर खरोखरच प्रेम करतात. पण त्यांची मते व सुचवलेले उपाय "भडक" नसल्याने पचत नाहीत. अशा माणसांचे उदाहरण म्हणून अशोक केळकरांचे नाव घेता येईल.

परंतु मराठीवर सर्वसामान्य माणसाचे ही आपली लहानपणापासूनची भाषा म्हणून जे नैसर्गिक प्रेम आहे; त्याचाच मुख्य आधार कोणत्याही मराठीप्रेमी सैद्धांतिक भूमिकेला अखेर असतो हे उघड आहे.

जगाची ओळख ज्या भाषेतून प्रथम झाली, त्या भाषेबद्दल जिव्हाळा असतो. बहुतेक माणसांच्या बाबतीत लहानपणी नात्याने जवळची, प्रेमाची माणसे ही तीच भाषा बोलतात त्यामुळे जिव्हाळा अधिक गडद होतो. प्रेमाने सांभाळणाऱ्या नोकराची भाषासुद्धा मुलाला जवळची वाटते, यावरून मी म्हणते, ते स्पष्ट होईल.

परंतु लहानपणाचे प्रेम मोठेपणी जर व्यवहारात अजिबात आर्थिक, राजकीय फायद्या-साठी उपयोगी पडले नाही, तर ते कितपत टिकाव धरेल ! ते प्रेम भूमिगत होईल आणि माणूस दुसरी भाषा शिकेल. या दुसऱ्या भाषेवर तो प्रेम करीलच असे नाही. त्याबद्दल दुभंग वृत्ती अधिक शक्य आहे.

मला वाटतं, आपल्याकडे इंग्रजीबद्दल सर्वसाधारणपणे हीच वृत्ती आहे. धरलं तर चावतं, सोडलं तर पळतं, अशी.

## भाषावार प्रांतरचना

अखेर हेही पाहिलं पाहिजे, की भाषावार प्रांतरचनेमागे मूळ हेतू कोणते होते !

शंभर टक्के एकभाषिक राज्य आणि एकूण एक भाषक त्याच राज्यात, असे उद्दिष्ट केव्हाही नव्हते. भारतात ते तर अशक्यच आहे. साधारणपणे सलग, मोठा भूभाग आणि बहुसंख्येने एकभाषक लोक आणि त्याला शक्यतो नैसर्गिक भौगोलिक सीमा असा व्यावहारिक उद्देशच मुळात होता. शिवाय अतिप्रचंड राज्येही व्यवस्थापनाला गैरसोयीची. त्यामुळे एका भाषेची अनेक राज्ये असायला तात्त्विक अडचण काहीच नाही. खरं म्हणजे पण प्रत्यक्षात फक्त हिंदीच तशी आहे. इतरत्र तशा प्रयत्नांना स्थानिक विरोध आहे.

एक भाषा, एक राज्य याचाच अर्थ एका भाषेला एका राज्यात फक्त सर्वोच्च मान, असा घेतला जातो आहे. आणि सिंधीला भूभाग नाही, उर्दूला समांतर दर्जा, कोंकणी – मराठीची जुगलबंदी, प्रमाण हिंदी विरुद्ध स्थानिक प्रमाण बोली, असे किंवा अशाच प्रकारचे वादविवाद आहेत.

त्याहून वाईट म्हणजे इतर राज्यांत ज्यांना राहावे लागते त्या सर्वांना कळत नकळत दुय्यम दर्जा. आंध्रात मराठीला, कर्नाटकात मराठीला वगैरे. आणि मराठी माणसाचे दुखणे नेमके येथेच सुरू झाले आहे. मराठी माणसाला खुमखुमी वाटते आहे, की आपणही आपल्या राज्यात असे " कर्तृत्व " दाखवावे; आणि मागचापुढचा विचार न करता त्याला खतपाणी घालणारी तथाकथित नेते मंडळी आहेत.

परंतु महाराष्ट्रात मुंबई हे महानगर या राज्याच्या जन्मापूर्वीपासूनच बहुरंगी, बहुढंगी आहे. मुंबईला आंतरराष्ट्रीय महत्त्व आहे. ते शहर मारून मुटकून एखाद्या वाई–सातारा प्रमाणे " मराठी " बनवता येणार नाही. मुंबईची स्थिती आशियाखंडात लंडनसारखी आहे, बहुरंगी किंवा न्यूयॉर्कसारखी सुद्धा. वैध आणि अवैध आर्थिक व्यवहारांची राजधानी.

आपण आपले मराठी प्रेम दाखवताना आगामी आर्थिक, राजकीय गरजांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. राज्य शासनाला ही जाणीव असावीच लागेल. पण निवडून येताना काहीही घोषणा दिल्या, तरी सत्ता वापरताना विवेक ही वस्तुस्थिती आहे.

## भाषांच्या प्रवृत्तीची जाणीव

भाषेबद्दल एक फार मोठी समजूत सर्वांपर्यंत पोचायला हवी. ती म्हणजे सक्तीने ठराविक दिशेचा बदल घडवणे अशक्य आहे. हजारो वर्षांचा इतिहास भाषांना असतो. भावनिक लागेबांधे असतात. भाषेची प्रतिष्ठा लोक ठरवतात, शासन नाही. याचे उत्तम उदाहरण रशियात दिसते. रशियनचे प्रभुत्व एकहाती शासनाने ठेवले, तरीही निरनिराळे प्रदेश आपली अस्मिता जपतच राहिले. १९१७ पासूनच्या प्रयत्नानंतरही रशियन सर्वांना येत नाही. भारतात हिंदीची परिस्थिती तशीच आहे आणि आपले प्रयत्नही तितके जोम-

दार नव्हतेच म्हणा. आता रशियात भाषा-संस्कृती या आधारावर स्वायत्तता मागितली जात आहे, याचेही आपल्याला भान हवे.

उलट, युरोपात जवळ जवळ प्रत्येक सुशिक्षित इंग्रजी शिकायला धडपडतो. कारण ती आंतरराष्ट्रीय महत्त्वाची भाषा आहेच.

आपण या सगळ्यापासून बोध घेऊन "मराठीवरचे प्रेम" अशी एकसुरी भूमिका न घेता मराठीचा भरपूर वापर आणि इंग्रजी, हिंदी यांवर अनेकांचे प्रभुत्व अशी दुहेरी महत्त्वाकांक्षा ठेवली पाहिजे. इंग्रजी-हिंदीच काय पण जपानी, चिनी, रशियन, जर्मन, फ्रेंच इ. ची ही गरज वाढणार आहेच.

मराठीचा पक्का पाया आणि त्यावर मग प्रत्येकाच्या गरजेप्रमाणे बहुभाषिक प्रभुत्व हे धोरण व्यक्तीपुढे हवे. म्हणजेच ते शासनाच्या धोरणापुढे हवे.

कोणी कितीही बडबड केली, तरी शेवटी शैक्षणिक धोरणाची आखणी आणि अंमलबजावणी यावरच भावी पिढीचे व्यक्तिमत्त्व खूपसे अवलंबून असते.

परंतु ते पूर्णतः त्यावर अवलंबून नसते. भाषेच्या विकासाला स्वतःचा असाही वेग आणि जडणघडण असते. जगभर पाहिलं तरी मरणार मरणार म्हटलेल्या भाषा मरत नसून चिकाटीने जगत राहतात. आणि ठेवू या ठेवू या म्हणून सांभाळलेल्या शोभेपुरत्या उरतात.

लॅटिन, क्लासिकल ग्रीक, जुने हिब्रू आणि संस्कृत ही यांची उदाहरणे.

तर मराठीसकट अनेक भारतीय भाषा, रशियातल्या प्रादेशिक भाषा, आफ्रिकेतल्या भाषा वगैरे पहिल्या गटाची उदाहरणे.

एखाद्या भाषासमूहाची लोकसंख्या आणि आर्थिक ताकद जर प्रमाणाबाहेर कमी झाली, तर मात्र त्या भाषा मार्जिनलाईझ होतात. अनेक आदिवासी भाषांचे तसे झाले आहे.

आजच्या जगात जी भाषा लिपियुक्त आहे, लिहिली वाचली जाते, जिच्यात वाङ्मय निर्माण होते व जिच्या भाषकांमधे राजकीय व आर्थिक ताकद आहे, ती मरणे अशक्यच आहे.

मात्र भाषाशास्त्रीय नियमांनुसार तिचे प्रमाणस्वरूप मात्र बदलत राहील ज्ञानेश्वरांच्या मराठीपासून आपण आजपर्यंत बदललो, तसेच पुढेही बदलू आणि ते बदल लोकांमुळे होतात. धोरणांमुळे नाहीत.

## उपाययोजना

शेवटचा महत्त्वाचा भाग, म्हणजे उपाययोजना. मला वाटते, की आता अशी वेळ आली आहे, की अमुक व्हावे, तमुक करावे, असे सांगण्यापेक्षा तपशीलवार कृतिकार्यक्रम सुचवावेत.

प्रथम ते पायलट-प्रकल्प म्हणून एखाद्या ठिकाणी चालवून पाहावे आणि नंतर ते

सुधारून सर्वत्र अंमलात आणावे. हे वेळ घालवणे नसून शेवटी हेच स्वस्त आणि दूरदृष्टीचे ठरेल. महाराष्ट्रातील सध्याची लोकांची मनोवृत्ती लक्षात घेता पायलट प्रकल्प एकदम महाराष्ट्राच्या प्रत्येक उपविभागात चालू करावेत. म्हणजे कोकण, विदर्भ, उत्तर महाराष्ट्र, मराठवाडा आणि पश्चिम महाराष्ट्र ( कोकण सोडून ), याशिवाय मुंबई शहर.

पायलट प्रकल्पांची मला अपेक्षित दिशा साधारणपणे सूचित करते.

१. आदिवासींना मराठी उत्तम यावे, म्हणून योजना. स्थिर आदिवासींना आणि भटक्या आदिवासींना तसेच प्रौढांना व बालकांना वेगवेगळे कार्यक्रम.
२. मराठी माध्यमाच्या मुलांना इंग्रजी उत्तम यावे, म्हणून योजना.
३. परप्रांतीयांसाठी मराठी शिक्षण.
   अ–प्रौढांना.
   आ–बालकांना.
४. इंग्रजी माध्यमातील प्रवेशाबद्दल मार्गदर्शक तत्त्वे ठरवणे. त्यात न बसणाऱ्यांना प्रवेश न देणे. या मार्गदर्शक तत्त्वात प्रादेशिक भाषेवर प्रभुत्वाची अट हवीच.
५. जी मुले त्यात जातील, त्यांचे मराठी शिक्षण.
६. भाषांतर विभागाची निर्मिती व त्यातून कालबद्ध निर्मिती–फक्त मुलांसाठी.
७. कोणत्याही परिस्थितीत पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षणाचे माध्यम इंग्रजी नसावे.

हे सर्व काम करताना आजपर्यंतचा अनुभव असा, की प्रकल्पाचे पाठ्यपुस्तक निर्दोष करण्यातच फार वेळ जातो. तसे न करता शिक्षकाची मनोधारणा निर्दोष करण्याकडे लक्ष पुरवावे. पाठ्यपुस्तकाखेरीज कितीतरी स्थानिक उपलब्ध मजकूर प्रत्यक्षच वापरता येतो. उदा., आदिवासींचीच गाणी, गोष्टी किंवा परप्रांतीय भौगोलिक माहिती.

वर दिलेले उपाय ज्यांच्या जीवनाचा व्यापक पाया मराठी भाषा हाच राहणार त्यांच्या-साठी– म्हणजेच बहुसंख्य मराठी माणसांसाठी आहेत.

आज जगभर पाहिले, तरी आपापली प्रादेशिक अस्मिता, राजकीय स्वायत्तता, सांस्कृतिक वेगळेपणा जपण्याची धडपड पूर्व युरोपासकट सर्वत्र चाललेली दिसते. टीचभर ब्रिटिश बेटांमधेसुद्धा स्कॉच, वेल्श, अस्मिता डोके वर काढत आहेत.

तेव्हा भारतात मराठी मरेल, ही चिंताच नको. तशी हाकाटी करणारा वर्ग स्वतःच्या न्यूनगंडाने ग्रस्त आहे.

सध्या जी माणसे इंग्रजीतून शिकून ऐन तारुण्यात आहेत व ज्यांना त्यामुळे नाळ तुटल्यासारखे वाटते, त्यांच्यासाठी काही करेक्टिव्ह मेझर्स घेणे शक्य आहे. ज्याप्रमाणे या पार्श्वभूमीतला मुलगा अभिनयासाठी आला, तर जब्बार पटेलसारखा माणूस प्रथम त्याचे मराठी बोलणे सुधारून घेतो. तशाच तऱ्हेने खाजगी क्लासेसमधून पैसे घेऊन हे प्रयत्न

व्हावेत. मराठी घेऊन पदवीधर झालेल्या सुशिक्षित बेकारांनी भाषा शिकवण्याचा डिप्लोमा घेऊन नंतर जरूर या उद्योगात पडावे.

काही पथ्ये :

उपाय करता अपाय होऊ नये म्हणून काही पथ्य आवश्यक आहे.

एक, जास्त पैसा खर्च केला, की जास्त कार्यक्षमता या भ्रमात राहू नये.

दोन, घोड्याला पाण्यावर न्यावे पण पाणी घशात ओतू नये.

तीन, भाषेच्या नावाने समारंभ आणि आणि उत्सव यांवर वायफळ खर्च न करता तो छोट्या गावात समृद्ध ग्रंथालये, त्यात पूर्ण वेळ ग्रंथपाल, पुस्तकनिवडीसाठी तज्ज्ञांची समिती, वैचारिक ग्रंथांचे प्रमाण किमान वीस टक्के, इत्यादी बाबींवर खर्च करावा.

## परिशिष्ट १

### कालबद्ध कृती

आपल्याकडील अनेक चांगल्या योजना कालबद्ध कृती नसल्याने अयशस्वी ठरतात. राखीव जागा हे सुद्धा त्याचेच उदाहरण म्हणता येईल. असे होऊ नये, म्हणून काही नव्या कल्पना सुचवत आहे. एक, प्रकल्पाचा डायरेक्टर सरकार बदलल्यावर बदलू नये किंवा प्रकल्प लगेच रद्द करू नये. रेल्वे, पोस्ट इ. ज्याप्रमाणे पक्षीय बदल फारसे लक्षात न घेता पारंपरिक कामे चालूच ठेवतात, तशीच शिस्त पाणीपुरवठा, शिक्षण, ग्रंथालये वगैरेंनाही हवी.

दोन, कार्यक्रम आखण्यासाठीच्या समितीत फारच थोडे सदस्य असावेत. अन्यथा बैठकाच होत नाहीत. बैठकांची तारीख दरमहा अमुक ठरवून घ्यावी. त्या वेळी एखादा सदस्य आला नाही, तर त्याची संमती गृहीत धरून काम पुढे न्यावे.

तीन, मानधन व प्रवासभत्ता भरपूर असावा, परंतु दरमहा त्यातली ५०% रक्कमच हातात ठेवावी व उरलेली एकरकमेने काम पूर्ण होईल, त्या दिवशी द्यावी. विद्वान मुद्दाम वेळकाढूपणा करतात, अशी अनेक उदाहरणे यापूर्वी घडलेली आहेत व संशोधनात शासकीय अधिकाऱ्यांना विशेष कळत नसल्याने दोन्ही पक्ष स्वसमर्थन करून प्रकल्पाची मुदत आपल्या पोटाची जास्ती जास्त सोय याप्रमाणे आखतात, असेही पूर्वी घडले आहे.

चार, प्रकल्पासाठी नेमणूक करताना प्रकल्प-प्रमुखाचा सल्ला अंतिम मानावा. पेपर क्वॉलिफिकेशनवर भर देऊ नये. म्हणजे टीम उत्तम राहील. मुळीच उपलब्ध नसलेल्या विद्वानापेक्षा प्रामाणिकपणे काम करणारा किंचित कमी विद्वान अखेर काम तडीला लावतो हे विसरू नये.

## परिशिष्ट २

तरुण पिढीच्या मराठीची काही वैशिष्ट्ये. तरुण पिढी म्हणजे १९७० नंतर जन्मलेली. २० वर्षांपर्यंतची किंवा फार तर २०–२२ वर्षांची.

१. इंग्रजी माध्यमातून शिकलेले शहरी.

२. मराठी माध्यमातून शिकलेले शहरी.

३. मराठी माध्यमातून शिकलेले ग्रामीण.

असे ठळक भाग माझ्या लक्षात आले. वास्तविक इंग्रजी माध्यमातून शिकलेले ग्रामीण हाही गट आता तयार आहे. पण मला पाहायला मिळाला नाही.

गट–१ सर्वांत महत्त्वाचे लक्षण म्हणजे महाराष्ट्रातील लोकमानसाची कल्पना नाही. उदा. आणीबाणी, निवडणुका, दुष्काळ, पूर इ. विषय कमी माहीत आहेत. उच्चार–प्रमाण मराठी वाक्यरचना वापरू शकत नाहीत. वाक्याची प्रगती आघाताऽऽा गचके देत देत होते. अर्थानुसार आवाजाचा चढउतार ही मराठीची प्रवृत्ती न पाळल्याने एकदम त्यांचे बोलणे कळत नाही. प्रश्न, नकार, होकार यांच्या मराठी पॅटर्न्स वापरत नाहीत.

स्वरांमध्ये फरक नाही. व्यंजनांमधे ळ, ण खूपदा ल, न होतात. कलला, म्हनला इ. अ–आ चा फरक लुप्त होतो.

ऑ व अॅ चुकून मराठी शब्दातही वापरले जातात. उदा., माझी ऑई म्हनाली. व्याकरण– फार साध्या वाक्यरचना वापरतात. संयुक्त वाक्य इंग्रजीप्रमाणे जोडतात. मराठी पार्टिसिपल्सची समृद्धी यांच्या बोलण्यात नाही. उदा., मी केला तर तसं झालं. मी केल्यामुळे तसं झालं, असं म्हणत नाहीत.

विभक्तींमधे "ला" "चा" आहेत पण "ने" कमीच आहे. भूतकाळात पण तो काम केला, इत्यादी. (त्याने काम केले याऐवजी).

शब्दयोजना– थोड्याच शब्दांवर भागवतात. शब्दांच्या सूक्ष्म अर्थच्छटा दाखवताना इंग्रजीचा आधार घ्यावा लागतो. नाहीतर ढोबळ शब्द व त्याला तीव्रता किंवा सौम्यता दाखवणारे विशेषण लावून काम भागवतात.

उदा., फारच म्हणजे अप्रतिम सुंदर मुलगी.

परंतु मोहक, आकर्षक, चंचल, नाजूक, मादक असे शब्द माहीत नाहीत.

चिकणा किंवा टॉप दिसणारा मुलगा.

पण रुबाबदार, मर्दानी, बांधेसूद इत्यादी नाही.

शैली–लांबलचक मराठी संभाषण जवळजवळ नाहीच. प्रश्नांना तुटक, तुटपुंजी उत्तरं देतात. ठाम मत देण्यापेक्षा "मे बी" चा वापर खूपच.

तसेच वाक्प्रचार, म्हणी यांचा वापर फारच अल्प.

गट–२ मराठी माध्यमातले शहरी.

यांचे प्रमाण मराठीतून संभाषण बरेचसे वरच्या पिढीशी जुळते. सलग आहे. परंतु अनुकूलता असती, तर इंग्रजी माध्यमात शिकलो असतो, अशी खंत मनात आहे. मराठीची चिंता यांतले बरेच जण तावातावाने करतात, वरच्या पिढीची मते न तपासता वापरतात.

गट–३ मराठीतून शिकलेले ग्रामीण.

आपल्याला पुरेसे प्रतिनिधित्व, प्रकाशनाची संधी, निर्णयात्मक सत्ता मिळत नाही, अशा यांच्या तक्रारी. यात प्रादेशिक बोली व प्रमाण मराठीची सरमिसळ आढळते आणि हुशार विद्यार्थी प्रयत्नपूर्वक संस्कृतप्रचुर शिष्टमान्य मराठी बोलताना दिसतात. आवडत्या प्रोफेसरांचा, लेखकांचा प्रभाव भाषेवर आहे.

शब्दयोजना– कधीकधी न समजता जाडा शब्द वापरला जातो.

उदा., परीक्षा संपली, की कसं निश्चेष्ट वाटतंय. (निवांतच्या ऐवजी)

शैली–मला तरी अधिक रसरशीत वाटली. अर्थ स्पष्ट करायला दृष्टांत देण्याची पद्धत.

सरतेशेवटी सांगायचं की ही माझी वैयक्तिक निरीक्षणं आहेत. ज्याने त्याने ती पडताळून पहायची आहेत. त्यात भर घालायची आहे.

[ मुंबई विद्यापीठाचा भाषाशास्त्रविभाग आणि मराठी विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने झालेल्या "नॅशनल सेमिनार ऑन डेव्हलपमेंट ऑफ मराठी–द पोस्ट स्टेट्स् रीऑर्गनायझेशन सीनेरिओ" या चर्चासत्रात वाचलेला निबंध. चर्चासत्राची तारीख : १९९०।३।१६-१७ ]

१२५/१ अ, मयुरेश सोसायटी, पौड रस्ता, पुणे ४११०३८

**तिचं काय चुकलं ?**

एका लहान मुलीनं 'निर्माता' या शब्दाचा अर्थ "ज्याला आई नाही तो" असा सांगितला. तिनं ह्या शब्दाचा असा अर्थ करण्यात तिचं काय चुकलं !

# बिस्मार्ककालीन नाणं

**मूळ जर्मन लेखन : यूरी ब्रेत्सान**
**अनुवादक : अंजनी खेर**

[ ' भाषा आणि जीवन 'मध्ये यापूर्वी काही जर्मन कथांचे अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. पण पूर्वजर्मनीतील साहित्यकृतीचा अनुवाद या अंकात प्रथमच देत आहोत. पूर्व जर्मनी-तील साहित्यिक व त्यांचं साहित्य यांविषयी आपल्याला फारच कमी माहिती असते. आपल्याकडील जर्मन साहित्याच्या अभ्यासकांमध्येही त्यावद्दल कमी कुतूहल आढळतं. बांधिलकीचं साहित्य म्हणूनही त्याच्याकडे दुर्लक्ष केलं जात असावं. पण त्यातही स्वतःचं अंगभूत सौंदर्य असतंच. जर्मनीच्या एकीकरणाच्या पार्श्वभूमीवर कुतूहलपूर्तीसाठी तरी या साहित्याकडे वळायला काय हरकत आहे ? –संपादक ]

ज्या भागात मुक्काम करायची मला बिलकूल परवानगी नव्हती, अशा भागातलं ते एक खेडं होतं. इथली दोन माणसं सोडली, तर मी कोण ते इतरांना माहीत नव्हतं. म्हणजे माझं नाव तेच होतं. पण त्याव्यतिरिक्त सर्व गोष्टी खोट्या होत्या. आणि एवढं सारं खोटं बरोबर वागत राहिल्यावर नुसतं नाव मूळचं असलं तरी माणूस ? ह्या सगळ्या खोट्या गोष्टींनीच आता माझं व्यक्तिमत्त्व बनवायचं होतं. माझी विजार शिकाऱ्याची असायची. पायांत रोज चकचकीत बूट असायचे. हाताचे पंजे स्वच्छ राहावेत, म्हणून चामड्याचे हातमोजे वापरायला लागलो. आणि माझे आश्चर्यचकित डोळे- पोलिश युद्धकैद्यांनी त्यांच्या बराकी म्हणजे निव्वळ गुरांच्या लायकीचे गोठे होते, असं सांगितलं तेव्हा मला आश्चर्य वाटलं होतं. ते खरं कसं असेल ? आणि तसेच माझे कान. माझ्या मातृभाषेचा एकसुद्धा शब्द माझ्या कानात शिरू शकत नसे. अगदी मला उद्देशून दिलेले शिव्याशाप कानी पडले तरी कानात शिरू शकत नसत.

–आणि अर्थातच माझा उजवा हात. त्याला मी सलामीसाठी खांद्यापर्यंत समोर सहज उचललं जायला तयार केलं होतं.

गावातल्या एकमेव अशा विश्रामधामाच्या अंगणातल्या मनमोकळ्या प्रसन्न संध्या-काळीही खोट्या असायच्या. शाळामास्तर, जंगलखात्याचे प्रमुख, कोळ्यांचा मुखिया आणि काही प्रतिष्ठित नागरिक असे सगळे बरोबर असायचे. आम्ही बिलियर्डस् खेळायचो. मी खेळात खूप मजा येतेय् असं रोज दाखवायचो. आणि एक-दोन बिअरच्या राऊंड्सनंतर परतायचो.

पण काही लोकांना खोट्याचा वास बरोबर लागतो. आडाम म्हणून एक पोलिश युद्ध-कैदी होता. त्याचा माझ्या डोळ्यांवर कधी विश्वास बसला नसावा. तो सरळ एक दिवस माझ्याकडे येऊन म्हणाला :

" मला तुझी विजार दे. मी पळून जाणारेय्. "

—आणि मास्तरांचासुद्धा मी बिलियर्ड्समधे खरंच रमतो, ह्याच्यावर विश्वास नसावा. कुठल्यातरी अतिशय वाईट परिस्थितीच्या फटकाऱ्याने हे हडेलहप्पी जीवन वाट्याला आलं असलं तरी मूळचा मी खरा साहित्य–कला वगैरेंचा रसिक अभ्यासू असलो पाहिजे असं त्यांना वाटायचं. माझ्याशी ते नेहमीच तत्त्वज्ञान अन् कलेच्या प्रांतातल्या प्रश्नांची चर्चा सुरू करायचे. मी ही मग बोलू लागायचो. त्यांच्या ज्ञानाची आणि रसिक जाणकारीची कदर करू शकणारा मी एकटाच काय तो त्या परिसरात असल्यागत ते मला वागवायचे असेच एक दिवस ते मला म्हणाले :

' कधीतरी निवांतपणे घरी या. तुम्हांला एक खास चीज दाखवायची आहे. "

सायकलच्या जीर्ण टायरट्यूबला येतो. तसा उबगवाणा भपकारा मास्तर जवळ आले, की येत असे. संभाषण फार लांबायला नको म्हणून मी झटकन् हो म्हणून टाकलं आणि रेंजरसाहेबांना गाणी म्हणायची लहर आली होती, त्यांना सामील झालो.

ह्यानंतर पुन्हा मास्तर भेटेपर्यंत आमचं हे बोलणं मी विसरून गेलो होतो. मी माझा कमावलेला सलाम— उजवा हात खांद्याच्या रेषेत समोर आणून— केला. या वेळी मास्तरांनी आणखी कळकळीचा आग्रह केला. :

" तुम्ही ह्या गावात राहताय्. पण याची तुम्हांला काय माहिती आहे बरं ? तुम्हांला आवडेल अशी पुष्कळ माहिती माझ्या संग्रही आहे; मी स्वतः कष्ट घेऊन, हिंडून जमा केलेली. अहो, ह्या गावाचं नवीन नावसुद्धा मी शोधलंय्. साजेसं आहे की नाही ? "

मास्तरांचा आवाज खास गुपित उघड करताना होतो तसा उत्सुक घोगरा झाला.

चार-पाच वर्षांपूर्वी ह्या गावाचं नाव जरा नाजूक-साजूक कानांत किणकिणणारं असं स्लाव्हिक होतं. एखाद्या लाजिरवाण्या इतिहासाचे अवशेष घाईघाईने पुसून टाकावेत तसं ते त्वरेने बदलण्यात आलं होतं. नव्या नावाच्या पाट्या पंचक्रोशीत सगळीकडे लागल्या. दस्तऐवजांसाठी ठसेही तयार झाले. नवं जर्मनिक नाव कसं खणखणीत वीररसपूर्ण होतं.

मी अजून माझ्या नव्या व्यक्तिमत्त्वात पुरता विलीन झालो नव्हतो. मास्तरांना माझ्या चेहऱ्यावर चलबिचल दिसली असेल. माझ्या अगदी जवळ येऊन ते म्हणाले.

" येत्या रविवारी घरी याच. खास कॉफी आली आहे. आणि माझी बायको फारच छान कॉफी करते. " त्यांच्या जड श्वासाचा भपकारा पुन्हा एकदा माझ्या अंगावर आदळला.

रविवारी मी त्यांच्याकडे पोचलो तेव्हा सगळ्या शाळेत कॉफीचा वास दरवळत होता.

मास्तर आता शाळाप्रमुख असल्याने वरच्या मजल्यावरच्या प्रशस्त घरात राहत होते. मी जिना चढून वर आलो. मास्तर व्यवस्थित कपडे करून माझीच वाट बघत बसले असावेत. त्यांच्या पायांतल्या फरच्या सपाता विशेष उठून दिसत होत्या. माझ्या येण्यानं त्यांना खरा-खुरा आनंद झालेला दिसला.

बैठकीच्या खोलीतलं सामान चांगलं मजबूत आणि किमती दिसत होतं. चामड्याच्या बांधणीतल्या पुस्तकांनी कपाट भरलेलं होतं. भक्कमशा मोठ्या लिहिण्याच्या टेबलाशेजारी आणखी एक गोल टेबल होतं. त्याच्याजवळ दोन मोठ्या चामड्यानं मढवलेल्या खुर्च्या होत्या. गोल टेबलावर दोघांच्या कॉफीची तयारी केलेली दिसत होती. कपबशा अस्सल मायस्सेनच्या[१] असाव्यात. बशी उलटी करून मायसेनच्या तलवारींचा छाप आहे, की नाही हे पाहणं माझ्या नव्या सुशिक्षितपणाला शोभलं नसतं.

मास्तरांची पत्नी कॉफी घेऊन आली. "आमची आपली खेडवळ कॉफी आहे हो! बघा आवडतेय् का!" बाईंचे केस पांढरे झालेले होते. कमरेला व्यवस्थित एप्रन होता. माझ्या खानदानी रसिकपणाबद्दल बाईंचीही समजूत करून दिलेली दिसत होती.

कॉफी अगदी माझी आई करत असे तशी झाली होती. आमच्या संभाषणात, म्हणजे मास्तरांच्या बोलण्यात तत्त्वज्ञान आणि गावातले प्रश्न सारखेच येत होते. 'नीत्शेनं म्हटलंच आहे...' किंवा 'रेंजर साहेब परवा म्हणत होते की...' अशी एकसारखी त्यांच्या वाक्याची सुरुवात होत होती.

—आणि मग मधेच उठून मास्तरांनी खास चीज बाहेर काढली. लिहिण्याच्या टेबलाच्या खणात खोलवर हात घालून त्यांनी एक हेनेसी[२] कोन्यॅकची बाटली बाहेर काढली. ज्यांचे कुणाचे मुलगे किंवा जावई फ्रान्सच्या प्रदेशावर ताबा ठेवणाऱ्या जर्मन सेनेत असत त्यांच्याकडे ही खास चीज असायची. पण मास्तरांना तर मूलबाळ नव्हतं. मला किंचित आश्चर्य वाटलं. ते जाणवून मास्तर मनातल्या मनात खुदूखुदू हसले असावेत. मिटक्या मारत आणि जोडीला लॅटिनमधलं कुठलं तरी वचन म्हणत त्यांनी बाटली उघडली. मग त्यांच्या मते अस्सल अशा फ्रेंचमधे मोलिअरला उद्धृत केला. त्यावरून त्यांना निसर्गातल्या एका चमत्कारिक लहरीची आठवण झाली :

"आपले गावचे जहागिरदार आहेत ना, त्यांची ही नवी पत्नी काही तशा तोडीच्या घराण्यातली नाही. बघितलीय् ना तुम्ही ? तिचा मुलगा—तो मात्र अगदी आर्निमच्या-सारखे[३] नाक—डोळे घेऊन आलाय्; नाही ? वास्तविक काय संबंध त्यांचा आणि आर्निमचा !"

अशा सगळ्या दर्जेदार संभाषणावर आणखी हेनेसी म्हणजे साहित्य-कलांच्या रंगलेल्या दरबारात परिपूर्णतेचा क्षणच होता.

मास्तर पुन्हा उठले. आता त्यांचा अगदी मर्मबंधातलीच ठेव बाहेर काढल्याचा आवि-र्भाव होता. हाताच्या पंज्यात बरोबर मावेल एवढी ती एक डबी होती. ती मीच उघडावी,

म्हणून त्यांनी वाट बघितली. आत निळ्या मखमलीच्या बिछायतीवर एक जडसं सोन्याचं नाणं चमकत होतं.

मी ते उलट सुलट करून पाहिलं. मास्तरांचा चेहरा नाण्यासारखाच चमकत होता. ' मुलकी क्षेत्रातल्या महत्तम अजोड कामगिरीसाठी. ' त्याच्यावर लिहिलेलं मास्तरांनी मला वाचून दाखवलं. त्यांनी परत ते माझ्या हातात ठेवलं. मी ते नाणं आता नीट निरखायला हवं होतं. त्याच्यावर प्रशियाचा गरुड दिमाखात मिरवत होता. मुलकी क्षेत्रातल्या अजोड कामगिरीसाठी ? अशा प्रकारचा काही सन्मान प्रचलित असल्याची मला माहिती नव्हती.

" असे जास्तीत जास्त दहा पुरस्कार आजपर्यंत दिले गेले असतील. " मास्तरांनी आणखी माहिती पुरविली. त्यांचा श्वास आता माझ्या अंगावर आदळला नाही; सोन्यासारखा चमकदार हलक वाटला. मी अवाक् झालो. मी त्यांची आता मनोमन विशेषच कदर करू लागलोय असं मास्तरांना वाटत असावं.

माझ्या हातावरच्या नाण्याचं वजन प्रचंड वाढायला लागलं. प्रचंड वजनाचा रसरशीत तापलेला गोळा हातावर असल्यासारखं मला वाटायला लागलं. खूप जोरात किंचाळावंसं वाटलं. पण माझी जीभ हलली नाही. बिस्मार्कचं एक चांदीचं नाणं म्हणजेच हजारो उचकटलेल्या जिभा हे मला माहित होतं. सोन्याच्या नाण्यामागे किती जिभा असतील ? मी दातावर दात दाबून धरले. जिथे हसायला हवं, तिथे किंकाळी फुटली म्हणून मला मरायचं नव्हतं.

मी नाणं परत मखमली बिछायतीवर ठेवून दिलं. मास्तरांनी डबी सहज बाजूला सारली. त्यातल्या सोन्याला तशी काहीच किंमत नव्हती.

पण ते नाणं म्हणजे मास्तरांच्या अजोड व्यक्तिमत्त्वाची निशाणी होती. अशा व्यक्तीचा आदर करणं आणि तो व्यक्त करणं मी शिकलो होतो, की नाही ! आता बोलण्याची पाळी माझी होती. मी ग्लास उंच केला. मला सगळी कहाणी ऐकण्याची उत्सुकता वाटतेय असं दिसणं आवश्यक होतं. जिभेवर हेनेसी जळत होती. मास्तर काहीतरी म्हणाले. मला ते कळलं नाही. " अशा आडबाजूच्या कुग्रामात अशी एखादी व्यक्ती जगत असेल अन् व्यासंग करत असेल ह्याच्यावर विश्वासच बसत नाही. " मी शब्दांना रेटलं.

" रास्त अभिमानही नम्रतेच्या अवगुंठनातच असावा. " मास्तरांनी नेहमीसारखं सुभाषित सोडलं. आणि मग अगदी खालच्या पट्टीतल्या पण दमदार आवाजात त्यांची गोष्ट सुरू केली. पुढे सात-आठ वर्षांनी मला लक्षात आलं; त्यांनी स्वतःच स्वतःच्या मरणाच्या बातमीचा तर्जुमा करून ठेवला होता. त्यात ही गोष्ट अशीच आली होती.

* * *

एकोणिसावं शतक संपायच्या आधी दोन वर्षं मी ह्या गावात एक शिक्षक म्हणून उमेदवारीवर आलो. हे गाव तेव्हा सर्वार्थाने सर्बियन[४] होतं, फक्त सरकारवाडा सोडून. आणि गावातले महत्त्वाचे दोन-तीन अंमलदारही अर्थातच सर्बियन नव्हते. माझ्या शाळे-






तल्या मुलांना जर्मनचा गंधही नव्हता. आणि ते अगदी साहजिकच होतं. पण त्या कारणासाठी त्या सहा-सात वर्षांच्या कोवळ्या जीवांना चांगल्या मोठ्या दंडुक्याने बेदम मारलं जायचं. दंडुक्याच्या भीतीने मुलं अर्धवट काहीबाही जर्मन पाठ करायची आणि पुन्हा अर्धवट पाठांतरामुळे चुका केल्याबद्दल मार खायची. तो प्रकार अगदीच अमानुष होता. मी कळवळलो. नुकताच मी पेस्टॉलॉजीच्या शिक्षणविषयक तत्त्वज्ञानाचा अभ्यास संपवून प्रशिक्षित शिक्षक म्हणून बाहेर पडलो होतो. मला तिथे काम करताना माझीच शरम वाटायला लागली. मुलांना शाळेत कधीच शिक्षा करायची नाही, अशा टोकापर्यंत मी तत्त्वज्ञान ताणलं नव्हतं. पण ह्या मुलांचा अपराध तरी काय होता? इतक्या अजाण वयाच्या मुलांना अशी रोजच्या रोज मारहाण व्हावी असं त्यांनी काय केलं होतं? ती जर्मन नव्हती आणि सर्बियन होती म्हणून? मला मुलांची एकंदरीतच फार आवड होती. म्हणून तर मी हौसेने शिक्षक झालो होतो. ह्या क्रूरपणाला पायबंद घालण्यासाठी काहीतरी करायचं, असं मी ठरवलं.

माझे तेव्हांचे वरिष्ठ माझ्या हळवेपणाला हसले. पण माझ्या मानवतावादी भूमिकेचं थोडंसं कौतुकही त्यांना मनातल्या मनात वाटलं असलं पाहिजे. वयाच्या वडिलकीचा अधिकार वापरून पण मित्रत्वाच्या भावनेने, एखाद्या आपल्या नात्यातल्या माणसाने सांगावं तसं ते म्हणाले, "तुझं म्हणणं बरोबर आहे. परंतु शिक्षा बंद करण्याच्या वगैरे नसत्या चळवळी इथे सुरू करू नकोस. तरुण वयात असं काहीतरी ध्येयवादाने भारावून जाऊन करणं बिरणं तसं बरोबर आहे. पण त्यामुळे नुकसान फक्त आपलंच होतं. श्रेय काही मिळतं नाही. हे तुझ्या आत्ता लक्षात यायचं नाही. कुठेतरी आपलं स्वतःचं रेकॉर्ड खराब करून घेशील! शिवाय असं बघ! आधीच आपल्या जर्मन भूमीवर उपटसुंभ परके पुष्कळ आहेत. तुला आत्ता ही मुलं निष्पाप वगैरे दिसतायत. यांचेच पुढे उर्मट अरेराव होतील. आपल्याच पितृभूवर आपल्यालाच उपरं वाटायची वेळ आणतील. शिक्षा करण्यात खरोखर काय वाईट आहे? अरे, आत्ता ह्या मुलांना मिळणारा प्रत्येक सज्जड प्रहार पुढचे दहा प्रहार वाचवील; याची खात्री बाळग. कारण आयुष्य शाळेपेक्षा फार कठीण असतं. त्याचीच सवय करून घेतोय इथे आपण."

पण हेडमास्तर माझी खात्री पटवू शकले नाहीत. आणि ते बरंच झालं. मी तरुण होतो. मला ध्येयं होती आणि माझ्याजवळ कल्पनाही होत्या. माझं ध्येय आणि मास्तरांचं मत ही पितृभूमीचा सन्मान ह्या एका मुद्यावर मात्र एकत्र येऊन भिडत होती. तेवढ्यापुरतं त्याचं म्हणणं मानावं लागलं असतं. राष्ट्राच्या प्रतिष्ठेसाठी लढणाऱ्या परंपरेतलाच एक पाईक मला व्हायचं होतं. पण त्या मुलांबद्दलही पोटात कळवळा होता. अशा वेळी मी काय करायला हवं होतं? माझ्या राष्ट्रप्रेमानेच मला पुढचा मार्ग दाखवला. माझा राष्ट्राभिमान आणि माझ्यातला मुलांवर प्रेम करणारा शिक्षक यांचा मी सुरेख मेळ घालू शकलो.

माझ्या कर्तव्यात कसूर करणार नाही, अशी ग्वाही देऊन मी त्या दिवशी हेडमास्तरां-

कढून निघालो आणि बरोब्बर सहा महिन्यांनी त्यांच्या हातात माझ्या अभ्यासाचं फलित ठेवण्यासाठी पुन्हा त्याच्याकडे आलो. सर्बियन मुलांच्या समस्येसाठी राष्ट्राच्या प्रतिष्ठेला तसूभरही तडा न जाता काय करता येईल याचा आराखडा होता तो. मागच्या वेळी त्यांनी मित्रत्वाने हातात हात घेऊन निरोप दिला होता. तसंच आत्ता प्रेमाने स्वागत केलं. माझा आराखडा नंतर त्यांनी वरती कुठे पाठवला. ते मला सांगितलं नाही. पण तो सुयोग्य जागी पोचला असला पाहिजे. अधिकाऱ्यांच्या उतरंडीतल्या अगदी सर्वांत वरच्या नाही, तरी त्याच्या खालच्या म्हणजे वरून दुसऱ्या पायरीपर्यंत नक्कीच. तिथला अधिकारी निश्चितच प्रभावित झाला असणार. कारण १९०० साली माझा उमेदवारीचा काळ संपण्यापूर्वीच याच गावात माझी शाळेचा पर्यवेक्षक म्हणून नेमणूक झाली. मुलाखतीच्या वेळी शिक्षणाधिकाऱ्यांनी आपण होऊन माझ्या योजनेचा गौरवपूर्ण उल्लेख केला आणि आता त्याप्रमाणे मी काम करायला लागावं असं सांगितलं.

दुसऱ्याच दिवसापासून मी सर्बियन मुलांची मारहाणीची शिक्षा पूर्ण बंद केली. माझं लहानपण सुडेटन[५] प्रांतात गेलं होतं. त्याचा खूपच फायदा झाला. माझे वडील तिथल्या संस्थानिकांच्या मान्सफेल्ड–कोलियानी ह्या इस्टेटीचे अधिकारी होते. मला थोडीफार झेक भाषा अवगत झाली होती. लहान मुलांना काही विचार करायच्या आधीच निव्वळ संपर्कातून दुसरी भाषा येऊ लागते. त्याबद्दल त्यांना काही लाज वाटत नाही. नाही का? तेवढ्या माझ्या भाषेच्या बळावर मी बिगरीतल्या मुलांशी संवाद साधू शकलो. माझ्या अगदी साध्या साध्या चुका व्हायच्या. त्या बघून मुलांना खूपच मजा वाटायची. मग ती मला शिकवायची. त्यांची माझ्याबद्दलची भीती पूर्णपणे गेली. मी त्यांचा आवडता शिक्षक झालो. आमच्यांतला दुरावा तर संपलाच. पण पालकांशीही मैत्री जमू लागली. पालकांनाही त्यांच्या मुलांचा मार चुकल्याबद्दल कृतज्ञता वाटत असावी.

आता आपल्या शिक्षकाचं आपण आणखी लाडकं व्हावं यासाठी मुलं धडपडू लागली. जर्मन चांगलं शिकण्यासाठी श्रम घेऊ लागली. त्या दिवसांच्या आठवणींनी मला अजून खूप समाधान वाटतं. मी सरकारकडे दरमहा तीन ज्यादा टालरची[६] मागणी केली. त्यांतून दर आठवड्याला पहिल्या दोन मुलांना बक्षिसं देऊ लागलो. बक्षिसं म्हणजे जर्मन चॉकलेटचा मोठा बार, नाहीतर कँडी असायची.

संधी मिळेल त्या प्रत्येक वेळेला जर्मनचा उपयोग करण्याचा ध्यासच मुलांनी घ्यावा अशा तऱ्हेने मी त्यांना वळवलं. आपापसात तर ती जर्मन बोलतच. पण घरी आईबापांशीसुद्धा बोलायला मी त्यांना तयार केलं. अशा प्रसंगात लागणारी वाक्यं मुद्दाम शिकवू लागलो. म्हणजे "आई, भूक लागली." किंवा "बाबा, खेळायला जाऊ!" आता मुलं आईला ममा न म्हणता जर्मन पद्धतीने मुटी अन् बापाला पापा न म्हणता फाटी म्हणायला लागली.

मास्तर बराच वेळ थांबले. त्यांना एखादी फारच सुखद आठवण आली असली पाहिजे

त्यांनी माझ्या चेहऱ्यांच्या मुखवट्याकडे पाहिलं. मास्तरांच्या तोंडावर बिस्मार्कच्या पदकाचा प्रकाश पडला होता. माझ्या मुखवट्यावर बहुतेक काहीच भाव नसावेत. क्षणभर त्यांच्या चेहऱ्यावर ढग आल्यासारखं झालं. उजवी तर्जनी वर उचलून मला ते म्हणाले, " मला वाटतं, तुमच्या लक्षात येत नाहीये. ममा, पपा जर्मनमधे आहेच. पण सर्बियनमधेही तसंच आहे."

" अरेच्चा ! तुमची मानसशास्त्राची समज तर फारच थोर आहे, मास्तर ! " मी म्हणालो. दिव्याचा प्रकाश माझ्या तोंडावर अजिबातच पडत नव्हता, ते फार बरं होतं.

" मला मुलं फारच आवडतात. त्यामुळं मी ते सगळं होता होईल तितकं सोपं करायचा प्रयत्न केला."

" ते सगळं ? "

" ते सगळं, म्हणजे नुसतं जर्मन भाषा शिकणं नव्हे. दुसरी संस्कृती आत्मसात करणं !'

मास्तरांनी लिहून ठेवलेल्या त्यांच्या मरणोत्तर परिचयवजा बातमीत दुसरी संस्कृती आत्मसात करण्याचे उल्लेख बटबटीतपणाची मर्यादा गाठत होते.

" तुम्हांला माहीतच आहे, की मी ह्या पंचक्रोशीचा सांस्कृतिक अभ्यास आणि ऐतिहासिक संशोधन करत असतो. ही आवड कशी निर्माण झाली असेल, असं वाटतं ? ही मुलं हेच कारण. चांगल्या ( मश्रूम ) आळिंब्या कुठे उगवतात, चोरांना निश्चितपणे लपण्याच्या जागा कुठे आहेत, सुरेख आकाराचे चमकदार दगड कुठं सापडतात. ओढ्यात डुंबत बसायला छान जागा कुठल्या, भरपूर खेकडे कुठे पकडता येतात— काय काय त्यांना माहीत असतं ! ह्या सगळ्याला सर्बियन नावं होतीं. सर्बियन शब्दांच्या मुळापर्यंत जाऊन, त्यांचा अर्थ निश्चित करून– १९०२ साली बरं का हे सर्व- त्या सगळ्या गोष्टींना कानाला गोड वाटणारी, लोकवाङ्मयातली जर्मन नावं शोधली. जरा मोठ्या मुलांचा एक खास गट तयार केला. आणि १९१४ पर्यंत कितीतरी साहससहली नेल्या. ह्या सहलींना आम्ही ' सेडानची[७] लढाई ' असं नाव ठेवलं होतं. त्यामुळे मुलांना आपल्या पंचक्रोशीची नीट ओळख तर झालीच. पण मूळ सर्बियन नावंही पार निपटून काढणं जमलं बघा, पन्नास एक वर्षांपूर्वी ह्या ठिकाणांना काय नावं होती, ते माहीत असणारा मी एकटाच इथे आहे, म्हणजे बघा. आता तुम्हांला त्याचं काही महत्त्व वाटायचं नाही. तेव्हा मुलांचं शाळेबाहेरचं विश्व पार बदलून टाकण्यात एवढं यश मिळालं, म्हणूनच...

आमच्या सेडानची लढाईत ज्या मुलाला प्रशियन सेनाप्रमुखाची भूमिका हवी असेल त्याने जर्मनवर चांगलं प्रभुत्व मिळवलेलं असण्याची अट होती. मोठी अहमहमिका चालायची मुलांच्यात. शाळेबाहेरच्या कामात माझ्याबरोबर जास्तीत जास्त कष्ट घेणाऱ्याला प्रशियाच्या राजाची भूमिका मिळायची. जर्मन नीट न शिकणाऱ्या मुलांना फ्रेंच कैदी व्हायला लागायचं. बहुतेक सगळ्या मुली त्यात असायच्या. त्यांच्या वेण्यांना धरून ओढत आणायला मुलग्यांना मजा यायची."

" सेडानच्या लढाईची तयारी ही वर्षभर मुलांना जागरूक अन् शिकायला उत्सुक ठेवणारी गोष्ट झाली होती. आयुष्यात काही यश मिळवायचं असेल, तर जर्मन येणं, जर्मन संस्कृती आत्मसात होणं किती आवश्यक आहे, हे सांगताना मी गावापासून सुरुवात करायचो. गावचा प्रमुख किल्लेदार कोण? जंगलखात्याचा प्रमुख कोण? पोलिसप्रमुख कोण? मग आसपासच्या गावांमधे तरी कोणी सर्बियन शाळाप्रमुख आहे? कोणी सर्बियन माणूस सरकारच्या सल्लागार मंडळात आहे? पोलिस कमिशनर आहे? त्याच्या आणखी वरती राजाच्या दरबारात कोणी आहे? सैन्यात? आपले सम्राट कोण आहेत? असा खालपासून वरपर्यंत आढावा घेत जायचो."

किंचित थांबून पुढे विजयी चेहऱ्याने त्यांनी परत सुरू केलं.

" माझ्या पूर्वीच्या सगळ्या शिक्षकांना मोठे दंडुके घेऊन जे जमलं नव्हतं ते मला कसं जमलं बघा.

कधी कधी अर्थातच चुकीची उत्तरं यायची. अपयशाची किनार नसलेलं यश असूच शकत नाही, अशी म्हणच आहे ना! एक दिवस पाऊस रोहार्क एकदम उभं राहून म्हणाला.

" पण मी शेणगोठा करणारा, गुराखी होणारे. आम्ही सगळे काही सम्राट होणार नाही."

" मग बरोबरच नव्हतं का त्याचं?" मी फटकन् बोलून गेलो. पण मला त्या गोष्टीत तसा काही रस नव्हता.

" आजसुद्धा तो काही आपल्या जर्मन पद्धतीने अभिवादन करत नाही." मास्तर विषादाने म्हणाले.

*पाऊल रोहार्कला मी चांगलाच ओळखत होतो.* खरंच त्याचा हात काही जमिनीला समांतर खांद्यापर्यंत उंच होत नाही. त्याच्या मालकाच्या घोड्यांबरोबर तो सर्बियनमध्ये खूप गप्पा मारायचा. आणि मातृभाषा न समजणाऱ्या माझ्या कानांवर त्याचा विश्वास बसलेला नव्हता. पुढे सात वर्षांनी मी माझा मूळचा झाल्यावर तो एकदा भेटला, तेव्हा म्हणाला. " अडाण्यांपुरती तू तुझी भूमिका छानच वठवलीस. पण आडामला विजार तूच दिली होतीस. तिच्यावर चालेल असा, शर्ट मी त्याला दिला होता."

मास्तर म्हणाले.

" तो नुसताच हट्टी नव्हता. मूर्ख आणि मठ्ठही होता. तीन वेळा मी त्याला सहावीत मागे ठेवलं. तो वर्गात नीट बसायचा नाही. शिक्षा म्हणून बऱ्याचदा उभा असायचा. पाऊलच्या आई-बापांकडूनही मला पाठिंबा मिळाला नाही. असे अजून दोघं-तिघं होते. तरीही लवकरच गाव एका परिवर्तनापाशी येऊन ठेपलं. काही काळच —म्हणजे मलासुद्धा ही तयारी एवढ्या लवकर होईलसं वाटत नव्हतं —काही काळच प्रौढ माणसं आपआपसांत सर्बियन बोलायची. पण मुलांशी जर्मनच बोलत असत. मुलं आपापसांत केव्हापासूनच

जर्मन बोल लागली होती. मात्र आज्यांच्या बाबतीत काहीतरी करणं आवश्यक होतं. कारण एकदा आया कामावर गेल्या, की मुलांची गाठ आज्यांशीच असे. मुलांवर त्यांचा प्रभाव खूपच असायचा.

मग मी माझ्या बायकोची मदत घेतली. एकोणीसशे सहा साली आम्ही एक अंगणशाळा सुरू केली. माझी बायको चार-पाच वर्षांच्या मुलांना गोळा करून गाणी-गोष्टी शिकवायला लागली. मग शाळेत प्रथम प्रवेश करणारी मुलं थोडं फार जर्मन बोलतच यायची. अशी बारा वर्षं गेली. तेव्हा मग वरिष्ठांना कळवलं, की आराखड्याप्रमाणे परिवर्तन पूर्ण झालेलं आहे. तो एक पाऊल रोहार्क सोडला, तर माझ्या गावात सतरा–अठरा वर्षांचा कोणीही मुलगा सर्बियन बोलत नाही. आणि हे घडवून आणताना मी एकाही मुलाला दंडुक्याने शिक्षा केली नाही."

"खरोखरच ही थोर कामगिरी आहे, मास्तर." माझा आवाज घसा दुखत असल्यासारखा खरखरीत येत होता. तुम्ही एवढे धूम्रपान करू नये. प्रकृतीला जपावं." आता मास्तरांचा आवाज दुखवल्यासारखा जड येत होता. जड हातानीच त्यांनी डबी उचलली, "एकोणीसशे तेरा साली, साम्राज्य संस्थापनेच्या दिवशी मला हा सन्मान देण्यात आला. बर्लिनमध्ये गृह-मंत्र्यांच्या सचिवाने स्वतः घरी येऊन हा सन्मात मला दिला. पण त्याचा कुठेही उल्लेख नाही, की बातमी नाही. मलाही त्याबद्दल कुठे बोलायला परवानगी नव्हती. "तुम्ही एका गुप्त आघाडीवर लढला आहात." सचिव मला प्रेमाने म्हणाला होता. "आघाडी ! समोरासमोर कोण होते ! मुलं विरुद्ध राज्ययंत्रणा ?" मी निष्पापपणे विचारलं. मास्तर हसले. खरोखर फार गहन प्रश्न आहे. मी त्याचं उत्तर असं देईन – प्रगती आणि अभ्युदय एका बाजूला अन् दुसऱ्या बाजूला अडेल तट्टू अडाणीपणा."

बाईंनी परत कॉफी आणली ती घेऊन मी निघाली. जिना उतरताना खाली गाव–पराभूत, की काय म्हणावं त्या गावाच्या अभ्युदयाला ?– ते काळोखात बुडताना दिसत होतं.

C ३ कला – बसंत सोसायटी, भांडारकर रस्त्यावरुन १५ वी गल्ली, पुणे- ४११००४

## स्पष्टीकरणार्थ टीपा

१. मायसेन : जर्मनीतील मध्ययुगापासून प्रसिद्ध असं एक गाव. इथले काचसामान बऱ्याच काळापासून प्रसिद्ध आहे.

२. हेनेसी कोन्यॅक : हेनेसी ह्या फ्रान्समधील गावात तयार होणारी कोन्यॅक प्रसिद्ध आहे. आपण विशेष मेजवानीच्या जेवणानंतर पान खातो. तसे कोन्यॅक विशेष प्रसंगीच्या जेवणानंतर घेण्याचे पेय असते.

३. आशिम फोन आर्निम : एक रोमँटिक जर्मन कवी.

४. सर्बिया : आजच्या युगोस्लावियातला एक भाग

५. सुडेटन प्रांत : चेकोस्लोव्हाकियातला जर्मनीच्या सीमेला लागून असलेला प्रांत.

६. टालर : १९०७ पर्यंत जर्मनीत प्रचारात असलेल्या चलनातील सर्वांत मोठे चांदीचे एकक / नाणे

७. सेडान : फ्रान्सच्या उत्तरेकडचं ( Meuse ) नदीवरचं एक गाव. १९७० मधे प्रशियन म्हणजेच जर्मन फौजांनी तिसऱ्या नेपोलिनचा पाडाव करून ते जिंकून घेतलं. ह्या निर्णायक लढाईनंतरच प्रशियन पुढाकाराने जर्मनीच्या दुसऱ्या राईशची स्थापना झाली. हिटलरच्या आधिपत्याखालील राज्याला थर्ड जर्मन राईश असं म्हटलं जातं.

**करंगळीएवढे प्रेम**

...आता हिच्याशी मनमोकळेपणाने बोलायला कोणती हरकत? असे मनाचे शंका-निरसन करून करुणेश बऱ्याच निर्भय चित्ताने तिला म्हणाला, "बाबासाहेबांना माझी आठवण होत असेल; पण ती तुला होत होती का?"

त्या प्रश्नाबरोबर विभावरीने विनयपूर्वक स्मित हास्य केले. ते करुणेशाला ओझरते दिसले. आता तिच्या तोंडून काय उत्तर मिळते ते ऐकण्यासाठी तो कान टवकारून उभा राहिला,

विभावरी उद्गारली, "खरेच, रात्री तुम्ही जेवलेले नाही. तुम्हाला कोको पाहिजे ना?"

करुणेशाला जास्त धीर आला. तो एक पाऊल विभावरीच्या जवळ जाऊन म्हणाला, "अगोदर मला माझ्या प्रश्नाचे उत्तर पाहिजे."

"अगोदर मी तुम्हाला कोको करून देते." असे म्हणून विभावरी मागे सरू लागली. पण काही केल्या तिचे पाऊलच उचलेना.

"असे आढेवेडे का घेतेस?" करुणेशाने तिच्या डाव्या हाताची करंगळी आपल्या उजव्या हातात धरून विचारले, "माझ्या प्रश्नाचा अर्थ तुला कळतो ना?"

—वि. वा. हडप, विभावरी, आदर्श वाङ्मय प्रकाशन, पुणे १९३४; पृ. ६७-६८

(संग्राहक: दत्तात्रय पुंडे)





अनुक्रमणिका

# मराठी-कन्नड संबंध : भाषिक अंग

पंडित आवळीकर

मराठी-कन्नड संबंधांच्या भाषिक अंगाचा विचार मी करणार आहे. मराठी आणि कन्नड यांचा भाषा म्हणून अभ्यास करणं हे तौलनिक भाषाशास्त्राचं क्षेत्र आहे. त्या शास्त्राची–भाषाशास्त्राची- पद्धत एखादा भाषाशास्त्रज्ञ वापरील, तशी मी वापरणार नाही. अनेक कारणांसाठी. एक म्हणजे माझी दृष्टी वेगळी आहे. मराठी कन्नड यांचा तशा प्रकारचा अभ्यास हे माझं उद्दिष्ट नाही. मराठी-कन्नड संबंधांचं भाषिक अंग स्पष्ट करणं एवढाच माझा उद्देश आहे. दुसरं म्हणजे, भाषाशास्त्रज्ञांच्या तांत्रिक परिभाषेच्या घनदाट अरण्यात हरवले जाऊ नये अशी माझी इच्छा आहे.

भाषेची ' रचना ' (structure ) H. A Gleason यांनी उलगडून दाखवताना म्हटलं आहे. " Language operates with two kinds of material. One of these is sound. Almost any sort of noise that the human vocal apparatus can produce is used in some way in some language. The other is ideas, social situations, meanings. -English lacks any really acceptable term to cover the whole range the facts or fantasies about man's existence -the things man reacts to and tries to convey to his fellows. These two, in so far as they concern linguists may conveniently lebeled be EXPRESSION AND CONTENT[१]

भाषेची ही शारीरिक संकल्पना आणि भौतिक रचना या निःसंशय महत्त्वाच्या गोष्टी आहेत. पण भाषेशी संबंधित असणारा ' नाद ' कोणत्या प्रकारचा असतो ? ती कोणत्या प्रकारची ' वाचा ' असते ? त्या गोष्टी स्वतःला आणि एकंदर भाषेला ' भौतिक पातळी 'च्या वर नेतात काय ? भौतिक पातळी ओलांडणारी, अधिक चांगली अशी भाषेची संकल्पना किंवा रचना आपल्याजवळ आहे काय ? Gleason नी म्हटल्याप्रमाणं इंग्रजीत नसलेला मानवी अस्तित्वाला व्यापून टाकणारा एखादा शब्द आपल्याकडं आहे काय ?

होय, आपल्याकडं आहे.

मराठी कन्नड संबंधाचं भाषिक अंग ' आपल्याजवळ काय आहे ' आणि ' आपण कोण आहोत ' याचं भान आपल्याला नक्कीच देतं.

१. An Introduction to Descriptive Linguistics. p. 2





अनुक्रमणिका

मी दोन उदाहरणं देतो. एक आहे प्रभुदेवांच्या वचनातील आणि दुसरं आहे ज्ञानदेवांच्या 'ज्ञानेश्वरी' तील.

प्रभुदेव म्हणतात :

> "मातेंबुदु ज्योतिर्लिंग, स्वरवेंबुदु परतत्त्व,
> ताळोष्ठसंपुटवेंबुदु नादबिंदु कलातीत."[२]

ज्ञानदेव सांगतात :

> "वाचे बरवें कवित्व । कवित्वीं रसिकत्व ।
> रसिकत्वीं परतत्त्व ! स्पर्शु जैसा ॥"[३]

या झगझगीत उद्‌गारांच्या सखोल अर्थात गढून जाऊन मी अनेकदा 'सुखिया' झालो आहे : भोवतीचं सगळंच जग या उद्‌गारांनी उजळून टाकल्याचा अनुभव मी कित्येकदा घेतला आहे. प्रभुदेवांनी 'मात' हा शब्द 'शब्द' या अर्थानं आणि 'स्वर' हा 'नाद' या अर्थानं वापरलेला आहे. "मात म्हणजे ज्योतिर्लिंग, स्वर म्हणजे परतत्त्व, तालु ( Palate ) आणि ओठ यांचं 'संपुट' म्हणजे नाद, बिंदु आणि कला यांच्यापलिकडील रूप"

कन्नडमध्ये 'मात' चे 'बोलणं' ('माताडुवुदु')*; 'गोष्ट' ('आ मात बेरे') 'विचार' किंवा 'कल्पना' ('ओंदु मात हेळतेनी') असे वेगवेगळे अर्थ आहेत. मराठीतही 'मात' शब्द आहेच. अलीकडचंच उदाहरण द्यायचं झालं तर, 'काय सांगू देवाची मात !, झाला महार पंढरीनाथ' हे माडगूळकरांचे चरण उद्‌धृत करता येतील, कन्नडमधील 'मात' च्या अर्थांवर 'मात करणं' या वेगळ्या अर्थानं मराठीनं मात केली आहे ! इंग्रजीत ज्या प्रकारचा शब्द नाही, असा आपल्याकडं मराठी आणि कन्नडमध्ये असलेला शब्द म्हणजे 'मात'.

आपल्या दोन श्रेष्ठ संतकवींच्या अवतरणात समान असा एक शब्द आहे : तो म्हणजे; 'परतत्त्व', 'मात' आणि 'वाचा' हे शब्द 'Language' आणि 'Speech' यांचे निदर्शक आहेत. ( Ferdnand de Saussure नी 'langue' आणि 'Parole' यांच्यांत केलेला भेद मला इथं आठवतो. ) शब्दाला ज्योतिर्लिंगाची आणि नादाला परतत्त्वाची प्रतिष्ठा व पातळी प्राप्त करून देण्याचा चमत्कार प्रभुदेवांनी केलेला आहे.

---

२. Śunya Sampadane, Volume I, p. 182

३. ज्ञानेश्वरी, १८·३४७

* 'मातु' म्हणजे 'भाषा', उदाहरणार्थ, 'आरे मातु' म्हणजे 'मराठी भाषा' 'आडुवुदु' म्हणजे 'खेळणं', 'माताडुवुदु'चा अक्षरशः अर्थ शब्दाशी ( अगर भाषेशी ) खेळणं. हा खेळकरपणा लक्षणीय आहे.

ज्ञानदेवाना एक श्रेणी सुचवायची आहे, असं वाटतं. वाचा→कवित्व→रसिकत्व→परतत्त्व ही एक सोपानसदृश श्रेणी आहे. कदाचित त्या परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी या प्रसिद्ध वाचाप्रकारांशी समान अशा भाषेच्या अवस्थाही असतील. एकदा मी गमतीनं म्हटलं की, 'परा' ही 'Parole' ध्वनित करते! कवी हे द्रष्टे असतात. म्हणून 'कवित्व' हे मला 'पश्यन्ती'सारखं वाटतं. 'मध्यमा' ही सध्या जिला आपण middle Style' म्हणतो तिच्यासारखी आहे. आणि अखेरची 'वैखरी' ही 'परतत्त्वस्पर्शु' झालेली आहे. बाराव्या शतकातील प्रभुदेव आणि तेराव्या शतकातील ज्ञानदेव यांनी व्यक्त केलेले भाषांविषयक समान अनुभव मला फार महत्त्वाचे वाटतात.

संतकवींनी भाषेचा अगर वाणीचा तेजाशी किंवा 'शुभ्रपणाशी' जोडलेला संबंध विचारात घेतल्यावाचून मला राहवत नाही.

'वागीश्वरी' म्हणून संबोधली जाणारी आपली सरस्वती नुसतीच 'श्वेतपद्मासना' नाही: ती 'शुभ्रवस्त्रावृता'सुद्धा आहे. 'सर्वशुक्ला सरस्वती' असं आपण म्हणतो. आपल्या मराठी आणि कन्नड गूढानुभववाद्यांनी 'नाद' आणि 'बिंदु' या विषयीचे आपले अनुभव 'रंगांत' रंगवलेले आहेत. पण प्रकाशाचा शुभ्रपणा हा त्या रंगांत श्रेष्ठ असा आहे.

Spectrograms ची चर्चा करताना H. A. Gleason यांनी सर्वसामान्य करड्या रंगानं आणि विशिष्ट नादांनी भरून गेलेल्या क्षेत्रांचा निर्देश केलेला आहे. ते म्हणतात : " This is known to physicists as white noise." [४] हा 'शुभ्रध्वनी' आणि वागीश्वरीचा व ज्योतिर्लिंगाचा शुभ्रपणा यांचा संबंध जोडावयास हवा एवढंच मी इथं सुचवतो.

मराठीच्या कुळकथेच्या तपशिलात अगर तिच्या उत्पत्तीविषयक व्युत्पत्तींच्या वादात मी बिलकुल शिरणार नाही. पहिलं उपलब्ध मराठी वाक्य गोम्मटेश्वराच्या पायथ्याशी असलेल्या श्रवणबेळगोळ–शिलालेखात (श. ९०५; स. ९८३) आहे. वाक्य अगदी लहान, तीन शब्दांचंच आहे :

" श्री चावुण्डराजें करवियलें. "

" श्रीगंगराजे सुत्ताले करवियले " हे दुसरं वाक्य पहिल्या वाक्याखाली कालांतरानं खोदलं गेलं. गंगराजांचा प्रधान आणि 'चावुंडराय पुराण' या कन्नड ग्रंथाचा कर्ता असलेला चावुंडराय हा पहिल्या मराठी वाक्याचा 'शिल्प'कार असावा. ही घटना मराठी आणि कन्नड यांच्या जवळिकीवर प्रकाश टाकते. देवगिरीच्या यादवांच्या राजवटीत मराठीची भरभराट होऊ लागली. पण तेराव्या शतकापर्यंत तिचा कन्नडशी संपर्क राहिला होता.

---

४. An Introduction to Descriptive Linguistcs, P. 372.








यादवकालीन मराठीत या संपर्काच्या कितीतरी खुणा वेगवेगळ्या रूपांत दृग्गोचर होतात.*

उद्योतन सूरीनं 'कुवलयमाला' (स. ७७८) या ग्रंथात 'मरहट्ट' आणि 'कण्णाडा' यांच्यासकट अठरा 'देशी' भाषांचा उल्लेख केलेला आहे. 'अहिमाण कलहसीले' (='अभिमान कलहशील') हे त्याचं मरहट्ट्याबद्दलचं निरीक्षण 'वेधक' आहे. 'भेदक'ही आहेच! पण असली निरीक्षणं आणि त्यांच्या आधारे काढले जाणारे सर्व-सामान्य निष्कर्ष हे योग्य दृष्टिकोणातून पाहिले पाहिजेत आणि योग्य ती वजाबाकी करून ते स्वीकारले पाहिजेत. सगळेच महाराष्ट्रीय काही अभिमानी आणि कलहशील नाहीत. 'आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः' या दुसऱ्या एका निरीक्षणाची व निष्कर्षाची गोष्ट अशीच आहे. सगळेच दाक्षिणात्य काही 'आरंभशूर' नाहीत. कुणीतरी 'काहीं'चं निरीक्षण करतो. आणि 'सगळ्या'बाबत निष्कर्ष काढतो. 'काही' आणि 'सगळे' यांच्याविषयीचा गोंधळ, त्या गोंधळात तरबेज असणाऱ्या तर्कनिपुणांवर सोपवून, मी दुसऱ्या एका गोष्टी-कडं तुमचं लक्ष वेधतो.

मराठी आणि कन्नड यांचा 'देशी' भाषा म्हणून केला गेलेला उल्लेख महत्त्वाचा आहे. 'देशीपण' हे या दोन्ही भाषांना जोडणारं तत्त्व असल्यानं, त्याच्या (दोन्ही भाषां-तील) स्वरूपाचा सखोल आणि सविस्तर अभ्यास होण्याची निकड आहे. अंडय्याची 'कब्बिगर काव' (स. १२३५) ही काव्यकृती आणि ज्ञानदेवांची 'देशिकार लेणें' असलेली 'ज्ञानेश्वरी' (स. १२८०) यांच्यांत चिंतनीय असं 'देशीपण' आहे.

दोन्हीही प्रदेशात संस्कृत ही सामान्य माणसांच्या आटोक्याबाहेरची भाषा होती. म्हणूनच कर्नाटकात प्रभुदेव बसवेश्वरांसारख्यांना आणि महाराष्ट्रात महानुभाव व ज्ञानदेवा-दिकांना सामान्य माणसांच्या भाषेचा वापर करण्याची गरज वाटली. त्या काळात 'प्राकृत' मानल्या गेलेल्या भाषांवरील संस्कृतच्या कुरघोडीविरुद्ध एकनाथांसारख्या मराठी कवीनं आणि महालिंग रंगासारख्या कवीनं म्हणूनच बंडाचा आवाज मोठ्या जोमानं उठवला.

एकनाथांनी आपला आवाज चढवला आणि विचारलं,

"संस्कृतवाणी देवें केली। प्राकृत काय चोरांपासूनि जाली?॥"[५] असाच प्रश्न महालिंग रंगानं 'अनुभवामृता'त मोठ्या वक्तृत्वपूर्ण शैलीत उपस्थित केला आहे :

---

* 'यादवकालीन मराठी भाषा' या आपल्या ग्रंथात डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी या खुणांचा समर्थ मागोवा घेतलेला आहे.

५. काशीतल्या संस्कृत पंडितांनी एकनाथांच्या 'भागवता'ची शलाका-परीक्षा केली आणि अस्सल कृती म्हणून त्या ग्रंथाचा स्वीकार व सत्कार केला. त्यांच्या ग्रंथाची मिरवणूक काढण्यात आली, ही दंतकथासुद्धा बोलकी आहे.

" सुलिद् बाळेय हण्णिनिंददि
कळेद् शिगुरिन कब्बिनिंददि
अळिद् ऊष्णद् हालिनिंददि
सुलभवागिरप्पा ॥
ललितवह कन्नडद नुडियलि
तिळिद् तन्नोळु ताने मोक्षव–
–गलिसिकोडद् साले
संस्कृतदल्लि इन्नेनु ? ॥
कन्नड नुडियेंदु उपेक्षिस–
–लिन्नु हिरेयरि उचितवल्लदिदु,
कन्नडिये दर्पणविदल्लदे
भेदवेनु इदक्के ? ॥ "

त्याच्या म्हणण्याचा भावार्थ एवढाच : " सोललेल्या केळयाहून, साल काढलेल्या उसा-हून, निववलेल्या उष्ण दुधाहून (कन्नड) अधिक सुलभ आहे. कन्नड भाषेच्या लालित्याहून वेगळं, मोक्ष स्वीकाराहून अधिक असं संस्कृतमध्ये आणखी काय आहे ? कन्नड भाषेची उपेक्षा करणं हे थोरांना उचित नाही. ' कन्नडि ' ( =' आरसा ') म्हणजेच ' दर्पण '; याहून त्यात भेद कोणता ? "

एका मुद्द्याचं स्पष्टीकरण या ठिकाणी मला करायचं आहे. उद्योतन सूरींनं अठरा ' देशी ' भाषांत कन्नडचा समावेश करणं; कन्नडमधील ' देशीपणा 'चा मी निर्देश करणं आणि कर्नाटकात सोळाव्या किंवा सतराव्या शतकापर्यंत कन्नडला ' प्राकृत ' म्हटलं जाणं[६] या गोष्टी योग्य प्रकारे समजून घेतल्या पाहिजेत.

मी आधी म्हटल्याप्रमाणं एकेकाळी मराठी आणि कन्नड या फार जवळच्या भाषा होत्या. ज्ञानदेवांच्या काळापासून(च) त्या दुरावण्याची क्रिया सुरू झाली. त्यांच्या वाङ्मयातील ' दुर्बोध ' या अर्थानं वापरला गेलेला ' कानडा ' किंवा ' कानडे ' हा शब्द ही ' जुळी भावंडं ' एकमेकांपासून दूर चालल्याचा निदर्शक आहे.

तुकारामांच्या काळात तर महाराष्ट्रीयाचं आणि कन्नडिगांचं दुसऱ्याच्या भाषेबद्दलचं अज्ञान विनोदी अवस्थेपर्यंत जाऊन पोचलं. तुकारामांचा ' कानडीने केला मऱ्हाटा भ्रतार ' हा अभंग[७] त्या दृष्टीनं मोठा गमतीचा आहे.

" कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥ १ ॥
तिनें पाचारिलें इल बा म्हणोन । येरू पळे आण जाली आतां ॥ २ ॥

---

६. मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या, पृ. ९६.
७. श्री तुकारामबाबांच्या अभंगांची गाथा, अभंग ८७, पृ. २३.

कानडीनं मऱ्हाटा भ्रतार करण्याचा परिणाम काय झाला ? दोघांत 'संवाद 'च होईना. 'इल बा' (='इल्लेबा' म्हणजे 'इथं ये') म्हणून तिनं त्याला बोलावलं. पण अर्थ नकळल्यामुळं 'येरू' दूर पळत सुटला ! आणि त्यानं दुसरीच 'बाईल' केली !! या विनोदाची दुसरी बाजू देखील सांगता येईल. 'मऱ्हाटीनें केला कानडा भ्रतार' असाही अभंग लिहावा लागेल.

प्राचीन मराठी वाङ्मयाच्या आणि भाषेच्या अभ्यासासाठी कन्नडचं ज्ञान आवश्यक आहे. तसंच हळेगन्नडच्या अभ्यासासाठी मराठीचं ज्ञान आवश्यक आहे. माझे गुरू, कै. प्राध्यापक द. सी. पंगू आम्हांला त्यांच्या आयुष्यातील एक प्रसंग नेहमी सांगत.

एकदा पंगू जेवायला बसले होते. ते काहीसे अस्वस्थ दिसत होते, हे त्यांच्या पत्नीच्या नजरेतून सुटलं नाही.

सौभाग्यवतींनी प्रोफेसरसाहेबांना विचारलं, "आज काय झालंय तुम्हांला ? प्रश्न तरी कसला पडलाय् ?" ते क्षीणपणानं हसले आणि पत्नीला म्हणाले, "माझ्यापुढील प्रश्न तुला सांगून काय उपयोग ? त्याचं उत्तर देणं तुला शक्य होणार नाही."

"निदान मला प्रश्न तरी समजू दे." सौभाग्यवतींनी आग्रह धरला.

"मला आता तास घ्यायचा आहे. माझ्या वर्गात एक शिष्योत्तम आहे. तो फार चौकस आहे. मला माहीत नसलेल्या एका शब्दाचा अर्थाचा तो मला नक्कीच विचारणार. मला तो शब्द कोणत्याही शब्दकोशात आढळला नाही."

"कोणता शब्द ?"

"उतती."

"अं ! उत्तत्ती ! म्हणजे खारीक !" फुटलेलं हसू आवरत त्या उद्गारल्या.

आमचे प्रोफेसर स्तिमितही झाले आणि खूषही झाले. पण हा चमत्कार घडला तरी कसा ? त्यांच्या पत्नी कर्नाटकातील असल्यामुळं त्यांना कन्नड चांगलं येत होतं. 'कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार 'ची ही एक निराळी आवृत्ती आहे. असा चालता बोलता संदर्भ-कोश घरी नसल्याची उणीव काहींना जाणवेल : पण एखादी उणीव दुसऱ्या गोष्टीनं भरून काढण्याचा निसर्गाचा 'कायदा' विसरून चालणार नाही.

माझ्या गुरूंनी 'उतती' हा शब्द कुठं आलेला होता हे मात्र आम्हांला कधीच सांगितलं नाही. नंतर माझ्या वाचनात तो शब्द आला तेव्हा आमच्या 'गुरुचरित्रा 'तील त्या कथेचा संबंध 'श्री गोविंद प्रभुचरित्रा 'शी होता, हे मला कळलं.

गोविंद प्रभूना एकदा 'आरोगणा' म्हणून "गोडंबीया उततियांचें कूट" हे पदार्थ अर्पण करण्यात आले.[८] 'गोडंबी' (बोलीभाषेत 'ग्वॉडंबी') म्हणजे 'काजू' हाही

---

८. श्री गोविंदप्रभुचरित्र, लीळा ३०४, पृ. १०३

कन्नड शब्द आहे. डॉ. कोलते यांनी आपल्या आवृत्तीत 'उतती' चा बरोबर अर्थ दिलेला आहे.[९] पण 'गोडेंत्री' म्हणजे काय ? हे मात्र त्यांनी सांगितलेलं नाही.

हळेगन्नडच्या अभ्यासाला मराठीचं ज्ञान कसं सहाय्यक होऊ शकेल, याची काही उदाहरणं देतो. (त्या दिशेनं कन्नड कृतींचा अभ्यास कितपत केला गेला आहे, याची मला कल्पना नाही.) माझ्या वाचनात आलेल्या काही ओळींचं हे माझं नम्र निरुपण आहे.

आंडय्याच्या 'कब्बिगर काव' मध्ये एक ओळ अशी आहे :

"झारे, जझारे हळू रे, हो! हो! मझा."

या ओळीत 'जा' हे 'झा' झालेलं आहे एवढंच शं. बा. जोशी यांनी अचूक नोंदवून ठेवलं आहे.[१०] त्यांनी सुचवलेल्या या दुरुस्तीनंतर ती ओळ अशी होईल :

"जारे, जजारे हळू रे, हो! हो! मजा."

हे शब्द राऊतांच्या मुखातील आहेत. प्रसंग स्पष्ट आहे. या ओळीतील सूचना किंवा आज्ञा घोड्यांसाठी आहेत. 'जजारे' आणि 'मजा' यांचा मला काही अर्थ लागत नाही. ते शब्द 'जा जारे' आणि 'मा, जा' असे हवेत. 'मजा' या पर्शियन शब्दाचा अर्थ 'गंमत' किंवा 'मौज' हा अर्थ या ओळीत नीट बसत नाही. शिवाय त्या काव्यकृतीचा काळ पाहता, त्या ओळीत पर्शियन शब्द येणं हे असंभवनीय वाटतं. 'हो! हो! ही उद्‌गारवाचकं आहेत आणि त्यांचा या ठिकाणी 'थांब! थांब! असा अर्थ आहे. राऊतांना आपले घोडे थोडा वेळ थांबायला आणि मग पुढं जायला हवे आहेत. हळेगन्नडसंबंधी बोलण्याचा मला काही अधिकार नसला तरी अखेरचा 'मजा' हा शब्द 'मा जा' असा असावा, असं मला वाटतं. 'मा जा' म्हणजे 'मग जा' प्राचीन मराठीत 'मा' म्हणजे 'मग'.

पंप कवीच्या 'विक्रमार्जुन विजय' या काव्यात द्रोणाचार्यांच्या मुखात घातलेले काही उद्‌गार वरील पद्धतीनं अधिक स्पष्ट करता येतील. द्रोणाचार्य उद्‌गारतात : "अरे, होय जबाप्पा!" 'जबाप्पा' हा शब्द 'जा बाप्पा' असा दुरुस्त केल्याखेरीज त्याचा अर्थ लागणार नाही. बापाचाच कालांतरानं 'बाबा' झाला! 'जा बाप्पा!' म्हणजे 'जा बाबा!' मग त्या ओळीचा अर्थ : "अरे होय, जा बाबा!" असा स्पष्ट होईल.

कन्नड शब्दांचा प्राचीन मराठीतील उपयोग मुळातील किंवा रुढ अर्थ कसा अधिक निश्चित आणि समृद्ध करू शकतो, याची दोन उदाहरणं मी सांगणार आहे. 'आरोगणा' हा शब्द दोन्ही भाषांत आहे. रे. किटेलनी त्याचा अर्थ "Eating; meal"[११] असा

---

९. तत्रैव, पृ. ११२. कन्नड 'उत्तती' चा उल्लेख डॉ. कोलते करीत नाहीत.

१०. मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या, पृ. १००

११. A Kannda-English Dictionary, P. 165

दिलेला आहे.

'शून्यसंपादने' या विख्यात कन्नड ग्रंथात 'प्रभुदेवर आरोगणे' ('प्रभुदेवांची आरोगणा') हा 'एकोनविंशत्यपदेश' आहे. प्रकरणाच्या नावातील आणि 'गुहेश्वर लिंगद आरोगणेयनिंद या वचनातील 'आरोगणे' या शब्दाचा संपादकांनी 'Feast' असा इंग्रजी अर्थ दिलेला आहे.[१२]

मराठी 'आरोगणा' किंवा कन्नड 'आरोगणे' म्हणजे तुमच्या माझ्यासारखी माणसं घेतात, ते 'जेवण' किंवा झोडतात, ती 'मेजवानी' नव्हे. ते देवाचं जेवण किंवा ती देवाची मेजवानी होय. 'आरोगिसु' या कन्नड क्रियापदाचा अर्थ 'खाणं' असा असला, तरी ते क्रियापद देवाच्या खाण्यालाच लागू पडणारं आहे. 'आपल्या' जेवण्यासाठी कन्नड-मध्ये 'उण्णु' हे क्रियापद आहे : 'त्या'च्या जेवण्यासाठी मात्र 'आरोगिसु.'

'श्री गोविंदप्रभुचरित्र' आणि 'लीळाचरित्र' यांसारख्या ग्रंथांत गोविंदप्रभु आणि चक्रधर हे ईश्वरी अवतार असल्यामुळं त्यांच्या जेवणासाठी आणि जेवण्यासाठी 'आरोगणा' हे नाम आणि 'आरोगणें' हे क्रियापद आवर्जून वापरलं गेलं आहे.

'श्री गोविंदप्रभुचरित्रा'मधील एका लीळेतील काही भाग मी उदाहरणादाखल सादर करतो.

"लेंकरुवांसवें आरोगणें: ।। लेंकरुवें जेवीतें असति:
तवं गोसावी बीजें करीति: तयांसवें गोसावी आरोगण करीति: ।।"[१३]

इथं देवासाठीच वापरावयाचं 'आरोगणें' हे क्रियापद शीर्षकात येतं, ते कन्नड 'आरोगिसु' या अर्थानं. लेकरं 'जेवत' असतात. तिथं जाऊन गोसावी त्यांच्याबरोबर 'आरोगण' करतात.

लेकरांचं 'जेवणं' आणि गोविंदप्रभूंचं 'आरोगणें' यांत चरित्रकारानं केलेला सूक्ष्म भेद नोंद घेण्यासारखा आहे. 'आरोगणा' या शब्दातील ही अर्थपूर्णता मराठीनं जपली. पण कन्नडनं मात्र कदाचित नंतर हरवली असावी.*

दुसरं उदाहरण म्हणजे मराठीतील 'अवस्था' आणि कन्नडमधील 'अवस्थे' या एकाच अर्थाच्या शब्दांचं. मुळात हा संस्कृत शब्द खरा. पण त्याची मराठी आणि कन्नडमधील भिन्न अर्थच्छटा तपासण्यासारखी आहे.

---

१२. Sunyasampadane, Volume V P.142-143 and 147

१३. श्री गोविंदप्रभु चरित्र, लीळा ५, पृ. २.

* बीजें करणें' ह्या क्रियापदाचा 'गमन करणे', 'जाणे' असा अर्थ अभ्यासक सांगतात. पण त्याचा मुळात अर्थ 'येणं' असा असावा. 'बीजें' हा शब्द हळेगन्नडमध्ये 'बिजय' असा आहे. 'बिजय माडुवुदु' म्हणजे 'आगमन करणं' 'येणं', 'बिजय माडा करुणी गळरसा' ('करुणाकरांच्या राजा, आगमन कर.')

प्रभुदेव देशान्तराला निघाले आहेत. त्यांच्या वियोगाची कल्पना ही इतकी दुःखद आहे, की प्रभूंच्या शरणांबद्दल- ('शरण' म्हणजे वीरशैव संत)- बोलत असतानासुद्धा बसवेश्वरांना स्वतःचा उमाळा आवरता आवरत नाही. 'समर्थ भावनांचा सहजोद्रेक' त्यांच्या या वचनाला श्रेष्ठ काव्याची झळाळी देऊन जातो :

> " कंडडे मनोहरवु, काणदिर्डडे अवस्थे नोडय्या !
> हगलु इरूळहुदु, इरूळु हगलहुदु.
> इरूळु हगलोंदु जुग मेले केडेदंते इहुदु
> कूडलसंगन शरणार नगलुव धावतियिंद
> मरणवे लेसु कंडय्या ! "

(" पाहिलं, तर मन हरपलं, नाही पाहिलं, तर अवस्था पाहा, बाबा !
दिवस रात्र बनतो, रात्र दिवस बनते.
दिवस-रात्र एका युगाहून फुकट गेल्याप्रमाणं,
कूडलसंगाच्या शरणांपासून अलग होण्याच्या दुःखाहून मरणच चांगलं, पण बाबा ! ")

कन्नड 'लेसु' आणि मराठी 'लेस' किंवा 'लेश' ('ज्ञानेश्वरी'त आढळणारा) यांच्या अर्थच्छटा उकलण्याचा मोह टाळून, बसवेश्वरांच्या उपर्युक्त वचनाशेजारी सर्वार्थानं तुलनीय अशी ज्ञानदेवांची पुढील 'विराणी' मी उभी करतो :

> " पडलें दूरदेशी मज आठवे मानसीं ।
> नको नको हा वियोग, कष्ट होताति जीवासी ।। १ ।।
> दिनु तैसी रजनी जाली गे माये ।
> अवस्था लावून गेला अझूनि कां नये ।। धृ ।।
> गरूडवाहना गंभिरा येईगा दातारा ।
> बापरखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ।। २ ।। "[१४]

'अवस्थे' किंवा 'अवस्था' म्हणजे विरहवेदना खऱ्या; पण देव किंवा देवसदृश व्यक्तींच्या वियोगामुळं होणाऱ्या अशा. ती एक 'दिव्य हुरहुरी'ची जात आहे. कन्नड 'अवस्थे'चं 'doomsday' असं भाषांतर करण्याहून 'ईश्वर-वियोगाची वेदना' हा वर सुचवलेला अर्थ अधिक समर्पक ठरेल. 'हगलु इरूळहुदु, इरूळु हगलहुदु' आणि 'दिनुतैसी रजनी जाली' या चरणांतील साम्य तर अगदी भाषांतराच्या जातीचं आहे.

मराठी आणि कन्नडमधील समान 'शब्दसंग्रहा'चा काळजीपूर्वक आणि पूर्वग्रहरहित असा पद्धतशीर अभ्यास होण्याची गरज आहे.

समान शब्दांची फक्त यादी देणं तेवढंसं फलप्रद ठरणार नाही. अशा याद्या हा विस्तृत

---

१४. श्री. ज्ञानदेवाची गाथा, अभंग १९६, पृ. ५६.

आणि पद्धतशीर अभ्यासाचा ‘ कच्चा माल ’ ठरेल. एकेक शब्द मराठी आणि कन्नडमध्ये जितक्यांदा आला असेल त्या सर्व स्थळांची कालानुक्रमानं, कालौघात त्या शब्दाच्या उच्चारात, अर्थात आणि रूपात जे बदल झाले असतील, त्यांसह नोंदला गेला पाहिजे. म्हणजेच समान शब्दसंग्रहाचा ( Common Lexicon ) मोठ्या प्रमाणावर आणि खंबीर पायावर शब्दसंग्रहशास्त्रीय ( lexicographical आणि lexicological ) अभ्यास आता हाती घेतला पाहिजे.[१५]

त्या दिशेनं सतरा वर्षांपूर्वी मी एक नम्र प्रारंभ केला होता. प्राचीन मराठी वाङ्मयात– मुख्यतः महानुभवांच्या वाङ्मयात स. १२७३ ते स. १३६३ या काळात आढळणाऱ्या सहा कन्नड शब्दांचा विचार मी केला होता. माझा अशा अभ्यासाचा तो प्रारंभ निर्दोष किंवा भक्कम नव्हता. पण कदाचित या क्षेत्रातील तो सूचक पदक्षेप होता.

त्या टिपणासाठी मी निवडलेले शब्द हे होतेः

| मराठी | कन्नड | रे किटेलनी दिलेले अर्थ |
|---|---|---|
| १. ओलि ( वोलि ) | = ओल्लि | = ‘ a small dotra ’ |
| २. बावन | = बावन्न | = ‘ Sandalwood ’ |
| ३. बोणें ( बोन ) | = बोन | = ‘ boiled rice, food ’ |
| ४. मदवि | = मादिवे | = ‘ marriage ’ |
| ५. मेचु | = मेच्चु | = ‘ assent, approbation, what recommends itself is pleasant, etc. satisfaction, pleasure ’ |
| ६. हडप ( हडपु ) | = हंडप | = ‘ a small bag ’ |

जवळजवळ एका शतकात या शब्दांच्या अर्थात झालेले बदल मी टिपले होते; पण त्यांच्या रूपांतील बदल ध्यानात घेतलेले नव्हते.

हे शब्द आढळणाऱ्या सर्वच स्थळांची नोंद मी केली नव्हती आणि त्यांच्या कन्नड-मधील वापराचा विचारही केलेला नव्हता. माझ्या स्वतःच्या मर्यादा हेच तसं न करण्याचं कारण. अधिक सुसज्ज आणि अधिक प्रतिभावान अशा उद्याच्या अभ्यासकांपुढं, सु. म. कत्रे यांच्या शब्दांत सांगायचं, म्हणजे ‘ A new vista of research ’, ‘ संशोधनाचा एक नवीन असीम प्रदेश ’ खुला आहे.

आता मी वर्णप्रक्रिया ( Phonetics ) किंवा उच्चारप्रक्रिया ( Phonology ), प्रत्ययप्रक्रिया ( Morphology ) आणि वाक्यरचना ( Syntax ) यांच्याशी संबंधित

---

१५. Some Kannada Words in Old Maratti, Journal of the Karnatak University (Humanities), Vol V, June 1961; P. 148–152

असलेल्या परस्पर परिणामांच्या क्षेत्रावर दृष्टिक्षेप टाकतो. मराठी–कन्नड संबंधांतील उपर्युक्त अंगांची ही 'नमुनावजा पाहणी' ( Sample Survey ) आहे. नमुनेदार पाहणी नव्हे. मी मोजकीच उदाहरणं देणार आहे.

मी सुरुवातीला काय म्हणालो होतो, ते माझ्या स्मरणात आहे. भाषाशास्त्रज्ञाइतकं मला 'तांत्रिक' व्हायचं नाही, हे खरंच आहे. ही तांत्रिक परिभाषा फारशी सुखावह वाटत नसते ! 'किंवा'चा व्याप आणि ताप तांत्रिकतेबरोबरच विसरून मराठी-कन्नड-संबंधांचं वर्णप्रक्रिया/उच्चारप्रक्रिया हे अंग मी उदाहरणं देऊन स्पष्ट करतो.

आद्य / ए / आणि / ओ / हे वर्ण / ये / आणि / वो / असे उच्चारण्याची प्रवृत्ती दोन्ही भाषांत आहे. 'एल्लि'–'येल्लि' (=कुठं), आणि 'ओंदु'–'वोंदु' (=एक), ही कन्नडमधील उदाहरणं, 'एकनाथ–'येकनाथ' आणि 'ओस'–'वोस' (ओसाड) या मराठीमधील उदाहरणांशी तुळून पाहण्यासारखी आहेत.

उसन्या शब्दांतील ( borrowed words) / ओ / हा / वो / होतो हा लक्षणीय बदल आहे. कन्नडमधील 'ओगरू' (=भात) आणि 'ओगराळी' (भात वाढायचं उपकरण) मराठीत 'वोगरू' आणि 'वोगराळे' होतात. तर मराठी 'ओझे' (ओझं) कन्नडमध्ये 'वोज्जे' होतं.

कर्नाटकातील मराठी भाषक काही वेळा 'च' या व्यंजनाचा 'च़' असा उच्चार करताना आढळतात. 'चपाती', 'चटणी' यांच्याऐवजी 'च़पाती', 'च़टणी' असं ते म्हणतात, हा निःसंशय कन्नडचा प्रभाव आहे. मुळातील शुद्धतालव्य (Pure 'Palatal') व्यंजनाचा हा दन्त्यतालव्य ('Dento-Palatal') उच्चार ('च' प्रमाणंच 'छ' 'ज', 'झ' या व्यंजनांचा प्राचीन मराठीतसुद्धा श्रुतिगोचर आहे. या दंत्यतालव्य उच्चाराचा संबंध द्राविडी भाषांशी जोडताना Jules Bloch[१६] हे सत्याच्या अगदी जवळ होते, असंच म्हणावं लागेल.

'महाप्राण' ( Aspiration ) ही मराठी भाषेची विशेष प्रवृत्ती आहे. कन्नड शब्दात महाप्राण मिसळल्याची काही उदाहरणं देण्यासारखी आहेत.

| कन्नड | मराठी |
|---|---|
| बले | भले |
| बंगार | भंगार |
| अपू | अफू |
| गाणा | घाणा |
| दड्डु | धड्डु |
| कंब | खांब |
| कोब्बरि | खोबरे |

१६. La Formation de la Langue Marathe, P. 33

मूळ कन्नड शब्दांतील ' ह ' चा ' प ' करणं हीही मराठीची सर्वसामान्य प्रवृत्ती आहे.

| | |
|---|---|
| होळिगे | पोळी |
| हुरण | पुरण |
| होट्टे | पोट |
| हुण्णिवे | पुनव |

शेवटचं उदाहरण हे ' पौर्णिमा 'सारखा संस्कृत शब्द कन्नड आणि मराठी भाषा आपापल्या परीनं कसा ' आत्मसात ' करतात, याचंही द्योतक आहे. ' प ' चा ' ह ' ' करणं ' हा हळेगन्नडचा स्वभाव आहे. ' पालु '–' हालु ' ( =दूध ); ' पत्ति '– ' हत्ति ' ( =खेडं ) यांसारख्या शब्दांतून तो दृग्गोचर होतो.

महाप्राण प्रक्रियेबरोबरच ह चा प होण्याची प्रवृत्ती उघडपणानं न दिसणारी; पण ती प्रवृत्ती अदृश्य स्वरूपात जाणवणारी काही उदाहरणं मी टिपली आहेत. ' हेड '–' फडा ' ( =नागाचा ); ' हणिगे '-' फणी ' हे कन्नड-मराठी शब्द एकमेकांशी निगडित आहेत. हे एकदम ध्यानी येऊ नये, असा हा प्रकार आहे. कन्नडमधून हे शब्द मराठीत असे आले असावेत :

हेड → ( पेड ? ) → फडा. हणिगे — ( पणिगे ? )—फणी.

' पेड ', ' पणिगे ' ही या शब्दांतील ' मधली स्थिती ' आज अदृश्य असली, तरी तिच्या समर्थनार्थ पुरावे शोधावे लागतील.

प्रत्ययप्रक्रियेमध्ये अंत्य ' उ 'कार आणि ' वरि 'सारखं शब्दयोगी अव्यय यांचं महत्त्व लक्षणीय आहे. ' केलवु '..., ' हलवु ' ( - काही ) यांसारख्या कन्नड शब्दांत आढळणारा अंत्य ' उ ' कार प्राचीन मराठीत सर्रास आढळतो. ' वरि ' म्हणजे कन्नड ' वरम् ' (=पर्यंत). उदाहरणार्थ, ' गोदावरीवरम् '(=' गोदावरीपर्यंत '). ' पर्यंत ' या अर्थाचा ' वरि ' चा वापर शं. गो. तुळपुळे यांनी ' लीळाचरित्र ' आणि ' उद्धवगीता ' या ग्रंथातील ' गांवोवरि एति ' आणि ' नावेक वेऱ्ही ' या उदाहरणांनी स्पष्ट केलेला आहे.[१७]

याच ठिकाणी आणखी एका मजेशीर वैशिष्ट्याकडं मी बोट दाखवतो. ' अवरू ' (=ते) हे जरी कन्नड सर्वनाम असलं तरी, ते काही वेळा एक प्रकारच्या शब्दयोगी अव्ययाचं काम करताना दिसतं. उदाहरणार्थ, " देशपांडे आले " हे कन्नडमध्ये " देशपांडे अवरू बंदरू " असं होतं. पण ही घटना शब्दबद्ध करताना कर्नाटकातील काही लोक " देशपांडे ते आले " असं म्हणताना मी ऐकलं आहे. त्याच पद्धतीनं " देशपांडे अवरिगे हेळिद्दे " हा आशय मराठीत " देशपांडे त्यांना सांगितलं " असा व्यक्त होतो. यात एक प्रकारची मानसिक भाषांतराची (mental translation) अबोध क्रिया दिसून येते. " देशपांडे यांना सांगितलं " असं आपण प्रमाण मराठीत म्हणतो.

---

१७. यादवकालीन मराठी भाषा, पृ. ३३७

पण "देशपांडे यांना सगितलं" ही टर उडवावी किंवा हास्यास्पद ठरवावी, अशी व्याकरणाची चूक नसून ते मराठीच्या धारवाडी अगर उत्तर कर्नाटकी बोलीचं एक वैशिष्ट्य आहे.

वाक्यरचनेचा तपशीलवार विचार टाळून ज्यात कर्ता हा तृतीया विभक्तीत असतो, अशा मराठीतील 'खास' कर्मणिप्रयोगाची एक गंमत सांगतो. कन्नडमध्ये ( निदान आजच्या ) असा प्रयोग नाही. त्यामुळं 'रामानं काम केलं' हे वाक्य कन्नडमध्ये 'रामा केलस माडिदा' असं होतं. आणि त्यामुळंच कन्नडिग किंवा एखादी मराठी माणूस 'रामा काम केला' असा 'प्रयोग' करतो.

यानंतर मी काही समान वाक्प्रचारांची आणि म्हणींची उदाहरणं देणार आहे. या वाक्प्रचारांत आणि म्हणींत कालच्या आणि आजच्या माणसांचे अनुभव साठवलेले आहेत. या सारखेपणानं विविध अनुभव-क्षेत्रांत जणू भागीदारी केलेली आहे.

'होट्टे कडि' म्हणजे 'पोटात चावणं'. त्या कन्नड वाक्प्रचारात पोटातली 'चावरी' संवेदना आहे. तर 'पोटात दुखणं' मध्ये निराळ्या अर्थानं 'पोटदुखी' आहे. पण कोल्हापूरच्या आसपासच्या ग्रामीण परिसरात 'होट्टे कडि' या वाक्प्रचाराचं शब्दशः भाषांतर वाटणारा 'पोटात चावणं हा वाक्प्रचार मी स्वतः ऐकलेला आहे. मी टिपलेली समान वाक्प्रचारांची काही उदाहरणं अशी :

| कन्नड | मराठी |
|---|---|
| नाचिके एनिसु | लाज वाटणे |
| सूर्यनु मुळुगु | सूर्य बुडणं |
| अंदाजु कट्टु | अंदाज बांधणं |
| बिच्चि हेळु | उकलून सांगणं |
| कै तोरिसु | हात दाखवणं |
| कालु हिडि | पाय धरणं |
| बायि माडु | तोंड करणं |
| बायि हाकु | तोंड घालणं |
| मण्णु कोडु | माती देणं |
| कोट्ट बिडु | देऊन टाकणं,<br>देऊन सोडणं. |

'बिडुवुदु' ('टाकणं', 'सोडणं') या क्रियापदाचा सहायक धातू म्हणून कन्नड-मध्ये एवढा प्रचंड वापर होतो, की कुणीही थक्क व्हावं. 'माड बिडरी' : 'करून टाका हो' किंवा 'करून सोडा हो'; 'हेळ बिडरी' : 'सांगून टाका हो' किंवा 'सांगून सोडा हो', 'होग बिडरी' : 'जाऊन टाका हो' किंवा 'जाऊन सोडा हो' या कन्नड-

मराठी वाक्प्रचारांवरील कळस म्हणजे 'बिट्ट बिडरी': 'टाकून टाका हो', 'सोडून टाका हो', 'टाकून सोडा हो' किंवा 'सोडून सोडा हो'! 'बिडुवुदु'चा मराठीवरील परिणाम हा नुसता विनोद नव्हे. ती वस्तुस्थिती आहे.

यांहून समान म्हणी या अधिक चित्तवेधक आहेत:

'आलस्यगारिगे एरडु कॅलस, लोभिगे मूरु केलस'
'आळशाला दुप्पट काम, कृपणाला तिप्पट खर्च'

किंवा

'उण्णुवाग एरडु तुत्तु कडिमे उणबेकु,
माताडुवाग एरडु मातु कडिमे माताडबेकु'
जेवताना दोन घास कमी खावेत,
बोलताना दोन शब्द कमी बोलावेत'

शं. वि. जोशी यांनी आपल्या 'कन्नड प्रबोध'मध्ये अशा प्रकारच्या आणखी काही समान म्हणी नोंदलेल्या आहेत.[१८] मराठीत आजही प्रचलित असलेल्या दोन म्हणी मला 'शून्यसंपादने'मध्ये सापडल्या.

'ओंद माडहोदल्लि मत्तोंदायित्तेंब'[१९]
'करायला गेलो एक, झालं भलतंच'

आणि

'बेट्टद नेल्लिय कायि, समुद्र दोळगण उप्पू'[२०]
'डोंगरचे आवळे, समुद्रकाठचं मीठ'

खेड्यातल्या मंडळीत, आपल्याला अशा प्रकारच्या समान म्हणी आढळतात.

'ऊरिगे बंदाकी नीरिगे बरताळऽ'
'पाटलाची सून पाणवठ्यावर येणारच'

मराठीतील आणि कन्नडमधील समान म्हणींचा तौलनिक अभ्यास आपल्याला या दोन भाषांतील जवळिकीबरोबरच मानवी मनाचं आणि जीवनातील वास्तवतेचं यथार्थ स्वरूप उघड करील.

[पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात मार्च १९७८ मध्ये दिलेल्या व्याख्यानाची संपादित आवृत्ती.]

मराठी विभाग, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड ५८०००३

---

१८. कन्नड प्रबोध, पृ. १६०–१६५.

१९. Śunya Sampādane, Volume III, P. 82

२०. Śunya Sampādane, Volume I, P. 101

# कविता लेखनसंकेतांच्या

## रत्नाकर बापूराव मंचरकर

विरामचिन्हांच्या शास्त्रीय चर्चेत जरासा विरंगुळा म्हणून मुक्तेश्वरांच्या काही काव्य-पंक्ती समोर ठेवतो.

वर्णपंक्तीचे अबद्धाक्षर ।
शोधूनि खोडती अर्थज्ञ चतुर ।
तेवीं दुर्जन पापी तस्कर ।
पुसूनि हातें सांडिले ॥ ५७ ॥
हंसपद देऊनि वोळीं ।
उणें अक्षर रेखिजे मौळीं ।
तैसे गुणवंत उंच स्थळीं ।
मानें आणूनि स्थापिलें ॥ ५८ ॥
मात्रावेलांटीव्यंजनां ।
मस्तकीं मान गुरुसज्जनां ।
उकार होऊनि अग्रवर्णा ।
पायीं भजे विनयत्वें ॥ ५९ ॥

"मुक्तेश्वरकृत महाभारत– आदिपर्व (खंड दुसरा)", अ. का. प्रियोळकर (संपा.) मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९५३ पृष्ठ ५२९ प्रमाणे आदिपर्व अध्याय २५ मधील ५७–५९ या ओव्या येथे उद्धृत केल्या आहेत. त्यांत पाठभेद पुष्कळच असले तरी प्रस्तुत संदर्भात दुर्लक्षणीय आहेत.

पंडु, धृतराष्ट्र आणि विदुर यांच्या जन्मोत्सवाचे वर्णन करीत असतानाच पितामह भीष्माचार्यांनी हस्तिनापूरच्या राज्यकारभाराची घडी कशी बसविली; याचे वर्णन या अध्यायात विस्ताराने केले आहे. त्यातील या मधल्याच काही ओळी :

अर्थ जाणणारा चतुर वर्णपंक्तीचे अबद्धाक्षर खोडतो त्याप्रमाणे भीष्माचार्यांनी राज्यातील चोर पुसून टाकले.* हंसपद देऊन राहिलेले अक्षर माथ्यावर लिहितात, त्याप्रमाणे गुणवंतांना उच्च स्थानी सन्मानून बसविले. मात्रा, वेलांटी, व्यंजनाप्रमाणे गुरुसज्जनांना मान दिला तर उकार होऊन अग्रवर्णाची विनयाने सेवा केली असा या ओळींचा भावार्थ आहे.

चमत्कृती, संवेदनशीलता, कल्पकता आणि कल्पनागम्य उपमानांपासून वास्तवाभिमुख उपमानापर्यंतचे वैविध्य मुक्तेश्वरांच्या अलंकारविन्यासात आढळते. या ओळीही त्याची

* मराठी 'काकपदा 'करिता मुक्तेश्वर संस्कृत 'हंसपद' वापरणे पसंत करतात.





अनुक्रमणिका

साक्ष देतात. अस्मानी-सुलतानी भोगताना या कवीने एकनाथांप्रमाणेच आदर्श राज्याचे स्वप्न पाहिले. त्याचा हा एक लहानसा भाग आहे. त्यातूनही राजाच्या कर्तव्यांचे सूचन होते. लेखनसंकेतांचा येथील वापर कल्पक आहे. तो समर्पक व औचित्यपूर्णही आहे. चांगल्या कवीला काव्यजाणिवांचे सहज भान असते. भाषेच्या माध्यमावर, साधनावर त्याचे प्रेम असते. शब्दांप्रमाणेच लेखनसंकेत, त्यांचे आकार त्याच्या मनात ठसलेले असतात. त्यातूनच असा अलंकारविलास फुलतो.

मुक्तेश्वरांचे ( इ. स. १५७४-१६४० ) मनगट पकडणारी कल्पकता गोविंदाग्रजांनी ( इ. स. १८८५-१९२० ) आपल्या " विरामचिन्हे " या कवितेतून प्रकट केल्याचे सर्व प्रसिद्धच आहे. गोविंदाग्रजांची कल्पकता त्यांच्या कवितांतून निरनिराळ्या प्रकारांनी आविष्कृत होताना दिसते. त्यांच्या बुद्धिनिष्ठ कल्पनाविलासाचा एक नमुना ' विरामचिन्हे 'मध्ये आहे. विरामचिन्हे आणि जीवनातील पाच अवस्था यांना एकमेकांशी जोडण्यात त्यांची संयोजनशील कल्पकता प्रकट झाली आहे. त्यांच्या चमत्कृतिप्रियतेचा आणि भाषा-प्रभुत्वाचा एकात्म प्रत्यय त्यातून येतो. कवितेची मांडणी कल्पकतापूर्ण आहे तर तिच्यातील जीवनावस्थांवरील भाष्य वास्तवपूर्ण आहे. गोविंदाग्रजांच्या चिंतनशील मनोवृत्तीची ओळखही तीतून होते. अशी ही कविता ' भाषा आणि जीवन 'च्या संपादकांनी आठवणीने उद्धृतही केली होती.*

तथापि, गोविंदग्रजांबरोबरच केशवकुमारांची " कवीची विरामचिन्हे " ( केशवकुमार ) ( प्र. के. अत्रे ), " झेंडूची फुले " स. गं. मालशे (संपा.), मुंबई, दहावी आवृत्ती १९७८ (प. आ. १९२५ ) पृ. ७५-७६ या कवितेचीही आठवण व्हायला हवी होती. विडंबन-कवितेच्या विश्वामित्री सृष्टीवर केशवकुमारांची नामसुद्रा दिमाखाने झळकत आहे. " मानवी जीवनलेखातील गोविंदग्रजांनी दर्शविलेल्या ' विराम चिन्हां 'पेक्षा कवीच्या आयुष्यातील ' विरामचिन्हे ' निराळी असावीत, ही गोष्ट हल्ली शुद्धलेखनासंबंधी चालू असलेल्या वादास धरूनच नाही काय ! " असा लेखन-क्षेत्रातील वादग्रस्ततेला टोमणा मारणाऱ्या टीपेने केशवकुमारांची कविता सुरू होते.

जे दृष्टीला पडे, ते हवेसे वाटे, म्हणून गोविंदाग्रजांना चोहीकडे ' स्वल्पविराम ' दिसतात, तर दिसेल त्यावर काव्य करावेसे वाटे म्हणून केशवकुमारांना ' स्वल्पविराम ' दिसतात. जीवन जाणून घेताना गोविंदाग्रजांचे मन ' प्रश्नचिन्हांकित ' होते, तर कविता प्रसिद्ध कशी होईल या चिंतेने केशवकुमारांना प्रश्न पडतो. अर्धांगीच्या प्रेमाने भूमीवर स्वर्ग उतरल्या-सारखे वाटते आणि मग या ' अर्धविरामां 'वरून हलू नये, असे गोविंदाग्रजांना वाटते, तर अर्धांगीच्या नावावर कविता छापण्याची हिकमत लढविणाऱ्या केशवकुमारांनाही हा अर्ध-विराम मानवल्याशिवाय राहत नाही. प्रौढपणी विश्वरचनेचा विचार करणाऱ्या गोविंदा-ग्रजांचे मन विस्मयचकित होऊन ' उद्गारवाची ' बनते, तर काव्यगायन ऐकताना पळ

* भाषा आणि जीवन ८ : २, उन्हाळा १९९१








काढणारे श्रोते पाहून केशवकुमारांचे मन उद्‌गारवाची बनते. परमेश्वराच्या पायी पूर्णविराम मिळो, अशा गंभीर प्रार्थनेत गोविंदाग्रजांची कविता विराम पावते, तर कवीलाच पूर्णविराम द्यावा अशी प्रार्थना त्याला ऐकू न जाणाऱ्या आवाजात करणाऱ्या श्रोत्यांच्या कोरसाने केशवकुमारांची कविता विराम पावते. कविनामाने ही विधाने केलेली असली, तरी त्यांचा रोख त्या त्या कवितेतील निवेदकाकडे आहे, हे सांगावयाला नकोच. गोविंदाग्रजांची कविता चमत्कृतीकडून चिंतनाकडे जाते तर केशवकुमारांची कविता काव्यक्षेत्रातील अपप्रवृत्तींचा खरपूस समाचार खुबीदार पद्धतीने घेते. याद्दष्टीने प्रस्तुत कवितेचे त्यांनी दिलेले नोटेशनही पाहण्यासारखे आहे. ' काव्यगायनेच्छू बालकवींचीही त्यामुळे चांगलीच सोय होणार आहे. मात्र ' स्वरलेखन ' करताना आम्ही ' प्रो. मौलाबक्षांची चिन्हे ' न वापरता आमची स्वतःची ' चिन्हे ' वापरली आहेत, हे एक सुचिन्हच नव्हे काय ! ' ( पूर्वोक्त, टीप पृ. ७६ ) असे म्हणून या नोटेशनमध्ये विरामचिन्हांचाही हास्यकारक उपयोग त्यांनी केला आहे.

या सर्व कवितांत लेखनसंकेतांचा चमत्कृतिपूर्ण वापर दिसतो. पण त्यांचा भावसन्मुख वापरही कोठे आढळतो, तो असा–

श्वासांहीं लिहिली, विराम दिसती, ज्यामाजि बाष्पीय ते<br>
प्रीतीचे बरवे समर्थन असे संस्पृह्य ज्यामाजि ते;<br>
कान्तेची असली मला पवन हा पत्रे अता देतसे;<br>
डोळे झाकुनि वाचिता त्वरित ती संमूढ मी होतसे !

श्वासांनी लिहिलेली आणि बाष्पांचे विराम असलेली कान्तेची पत्रे अंगाला गारा बिलगणारा " नैर्ऋत्येकडील वारा " केशवसुतांना आणून देतो. ( केशवसुत, ' हरपले श्रेय ', रा. श्री. जोग ( संपा. ), पुणे, तृतीयावृत्ती १९७८ ( प. आ. १९५६ पृ. ३४ )

निरोपाला कंठ असतो रुद्ध होण्यासाठी<br>
अधेमधेच विराम देण्यासाठी विमनस्क हुंकारांचे

असे कृ. ब. निकुंबांना ( ' निरोपाला कंठ असतो ', गावकरी, दिवाळी अंक १९७१ पृ. १६ ) वाटते.

' अर्धचंद्र ' ( पंडित सप्रे ), ' स्वल्पविराम ' ( ब. चिं. सहस्रबुद्धे ) ही काही काव्यसंग्रहांची नावेच आहेत. पण त्यात लेखनसंकेतांच्या कविता आहेत, की नाही ते पाहण्यासाठी ती पुस्तके माझ्याजवळ नाहीत.

जी. ए. कुलकर्णी यांच्या आता नीट आठवत नसलेल्या कथेत— प्रश्नचिन्ह हे नवीन काही निर्माण करते. उत्तर मात्र पितृघातकी असते. ते जन्मतः प्रश्नचिन्ह पुसून टाकते— असा काहीसा लखलखीत विचार प्रकट झाला आहे.

भाषेच्या माध्यमावर/साधनावर लेखकांचे किती प्रेम असते आणि लेखनसंकेतांचाही ते कशा संवेदनशीलतेने अनुभव घेतात, याच्याच या साऱ्या आल्हाददायक खुणा आहेत.

५. प्राध्यापक निवास, रा. ब. ना. बोरावके कॉलेज, श्रीरामपूर जि. नगर ४१३७०९

# वैज्ञानिक$_1$ आणि वैज्ञानिक$_2$ ?

## सदानंद मोरे

विज्ञान हा शब्द 'सायन्स'साठी वापरला तर 'सायंटिफिक' आणि 'सायंटिस्ट' या दोन्ही शब्दांसाठी वैज्ञानिक हाच शब्द वापरला जात आहे त्याची व्यवस्था लावावी लागेल. 'सायंटिफिक'साठी विज्ञानीय शब्द चालेल का ?

तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७.

डॉ. मोरे यांच्या प्रश्नावरून चटकन सुचणारा प्रतिप्रश्न म्हणजे बिघडलं कुठं ? व्यवस्था लावलीच पाहिजे का ? थोड्या सावकाशीने सुचणारा प्रश्न म्हणजे मोरे यांच्या शंकेमागचे विचारसूत्र कोणते ?

.' जिथे अर्थवैषम्य, तिथे रूपवैषम्य : एकाच परिभाषेतल्या आणि एकाच संदर्भात येण्याजोग्या दोन संज्ञा घेतल्या तर त्यांच्यात घोटाळा होईल अशी त्यांचीशब्दरूपे नसावी : विशेषतः तुल्यार्थ संज्ञा समरूप किंवा तुल्यरूप नसाव्या.'

(अशोक रा. केळकर, वैखरी, १९८३, 'परिभाषेची परिभाषा', पृ. १७१, सूत्र ५)

वैज्ञानिक$_1$ (सायंटिफिक) आणि वैज्ञानिक$_2$ (सायंटिस्ट) या दोन संज्ञा समरूप आहेत, हे उघड आहे. पण त्यांचे अर्थ तुल्य आहेत का ? त्या एकाच संदर्भात येऊन अर्थाचा घोटाळा माजेल का ?

वैज्ञानिक$_1$ विशेषण आहे, वैज्ञानिक$_2$ नाम आहे. म्हणजे वैज्ञानिकाला, वैज्ञानिकासाठी अशी रूपे येतील तेव्हा ते नामच असणार, हे उघड आहे.

हा प्रश्न वैज्ञानिक आहे. (विज्ञानात मोडणारा)

असे मानणे वैज्ञानिक ठरणार नाही. (विज्ञानाला धरून)

माझा भाऊ हाडाचा वैज्ञानिक आहे. (विज्ञानाची उपासना करणारा माणूस)

भारत सरकारच्या सेवेत बरेच वैज्ञानिक आहेत. (विज्ञान हा ज्यांचा व्यवसाय आहे. अशी माणसे)

पहिली दोन उदाहरणे विशेषणांची आहेत. आणि या विशेषणाला दोन थोडेसे वेगळे अर्थ आहेत. दुसरी दोन उदाहरणे नामाची आहेत, आणि या नामालाही दोन थोडेसे वेगळे अर्थ आहेत.

म्हणजे वैज्ञानिक शब्दाची सध्याची अवस्था ठीक आहे. घोटाळा माजेल अशी स्थिती इथे नाही.





अनुक्रमणिका

थोडा विचार केला म्हणजे दुसरी एक गोष्ट मात्र लक्षात येते. ती म्हणजे वैज्ञानिक शब्दाच्या अवतीभवती थोडी अव्यवस्था आहे.

एक म्हणजे वैज्ञानिक१ आणि वैज्ञानिक२ यांसाठी अनुक्रमे शास्त्रीय आणि शास्त्रज्ञ हे शब्द मागच्या पिढीत वापरात होते आणि अजूनही ते वापरातून पुरते गेलेले नाहीत. पण ते शब्द या अर्थाने वापरातून हटायला पाहिजेत. कारण शास्त्र या रूपाला ' सायन्स ' आणि ' मानवी व्यवहार विहित पद्धतीने कसा चालावा याबद्दल आदेश देणारी ( भारतीय परंपरेतील ) व्यवस्था ' हे दोन अर्थ ठेवणे हे घोटाळा उत्पन्न करणारे ठरेल. किंबहुना हा धोका लक्षात आल्यामुळेच ' सायन्स 'साठी शास्त्र शब्दाऐवजी विज्ञान शब्द पुढे आला. शास्त्र शब्दाच्या पारंपरिक अर्थासाठी शास्त्रीय ( शास्त्राला धरून ) हे विशेषण आणि शास्त्री ( शास्त्राची उपासना करणारा ) हे नाम ही उपलब्ध आहेतच.

विज्ञान हा शब्द ' सायन्स ' या अर्थाने एकदा पसंत केल्यावर भाषाशास्त्र, मानसशास्त्र अर्थशास्त्र इत्यादी शब्दांऐवजी अनुक्रमे भाषाविज्ञान, मनोविज्ञान, अर्थविज्ञान इत्यादी शब्द अधिक पसंत करणे मग ओघानेच आले. अर्थशास्त्र या संज्ञेचा प्राचीन अर्थ ( राजाने भूमी संपादन करणे आणि तिच्यावर राज्य करणे या मानवी व्यवहाराचे शास्त्र ) साहजिकच कायम राहील; ' इकनॉमिक्स ' या अर्थाने मात्र अर्थविज्ञान ही संज्ञा वापरणे अधिक व्यवस्थित ठरेल.

पण मग ' इकॉनमिस्ट ' हे नाम आणि ' इकनॉमिक ' हे विशेषण यांचे काय ? नामासाठी अर्थशास्त्रज्ञ या संज्ञेची जागा अर्थवैज्ञानिक घेईल. विशेषणासाठी आर्थिक आणि अर्थशास्त्रीय हे दोन शब्द रूढ आहेत. पहिला तसाच राहील, तर दुसऱ्याऐवजी अर्थवैज्ञानिक हा शब्द वापरावा.

माझा भाऊ अर्थवैज्ञानिक ( अर्थशास्त्रज्ञ ) आहे.

देशाच्या आर्थिक नाड्या कुणाच्या हाती आहेत ?

हा प्रश्न आर्थिक नसून राजकीय आहे. ( अर्थव्यवहार, अर्थकारण यांत मोडणारा. )

हा प्रश्न अर्थवैज्ञानिक ( अर्थशास्त्रीय ) नसून समाजवैज्ञानिक ( समाजशास्त्रीय ) आहे. अर्थवैज्ञानिकांच्या अखत्यारीतला नसून समाजवैज्ञानिकांच्या अखत्यारीतला आहे. )

म्हणजे विशेषणाला दोन वेगळे अर्थ आहेत. मात्र ते तुल्य आहेत, त्यांच्यांत घोटाळा सहज होण्यासारखा आहे. ( या घोटाळ्याला परिभाषिक नाव कोटिप्रमाद, कॅटेगरी मिस्टेक हे राहील. )

जी गत आर्थिक आणि अर्थवैज्ञानिक ( अर्थशास्त्रीय ) या जोडीची, तीच गत त्या जोडीसारख्या इतर जोड्यांचीही आहे.

भाषिक आणि भाषावैज्ञानिक ( भाषाशास्त्रीय )

मानसिक आणि मनोवैज्ञानिक ( मानसशास्त्रीय )

आण्विक आणि अणुवैज्ञानिक ( अणुशास्त्रीय )

जैविक आणि जीववैज्ञानिक ( जीवशास्त्रीय )

दुर्दैवाने या बाबतीत इंग्लिश भाषेमधले घोटाळे आंधळेपणाने दत्तक घेण्याची मराठी-भाषकांची प्रवृत्ती आहे, आणि मग असली नामांकित वाक्ये तयार होतात !

आपले खेळाडू मनोवैज्ञानिक दबावाखाली खेळत होते. (म्हणायचे आहे—मानसिक दबावाखाली. )

आपल्या खेळाडूंची मानसिकता दोषास्पद आहे. ( म्हणजे काय ? म्हणायचे आहे—खेळाडूंची मनोवृत्ती, मनोधारणा. पण ' मॅंटॅलिटी ' या इंग्लिश शब्दाचे आंधळे भाषांतर करायचे आहे ना ! )

माणूस माकडापासून जीववैज्ञानिक विकासाच्या योगे उत्पन्न झाला. (म्हणायचे आहे—जैविक विकासाच्या योगे )

इंग्लिश भाषकांनी ' बायॉटिक ', ' सायकिक ', ' सोशल ' हे शब्द हाताशी असून ' बायालॉजिकल ', सायकलॉजिकल ', ' सोशलॉजिकल ' हे शब्द दोन्हीअर्थांनी वापरण्याचा अजागळपणा करायचा आणि आम्ही त्याचे आंधळे अनुकरण करायचे, असे किती दिवस चालायचे ?

तात्पर्य, अर्थवैषम्य आहे, पण शब्दरूपे समान किंवा तुल्य असतील, तर चिंता कुठे करायची, हे तारतम्याने ठरवावे लागेल. नाही तर नको तिथे विनाकारण चिंता करायची आणि चिंता करायला हवी, तिथे ' अतिपरिचियात् अवज्ञा ' असा प्रकार व्हायचा !

**अशोक रा. केळकर**

---

( पृष्ठ ५४ वरून )

हा सगळा प्रपंच WHYNOT BEST साठी केला आहे; आणि अनुवादाच्या बाबतीत कदाचित ' BEST ' पर्यंत पोहोचणे दुरापास्तच असते. म्हणून पुन्हा असेच म्हणावेसे वाटते, की श्याम विमल यांचा प्रयत्न स्तुत्य, प्रशंसनीय आहे. त्यांनी असेच प्रयत्न वारंवार करावेत म्हणजे हिंदी कविता मुळातून वाचण्याची ओढ मराठी वाचकांमध्ये वाढेल.

**हिन्दी विभाग, स. प. महाविद्यालय, टिळक रस्ता, पुणे ४११०३०**

# एक स्तुत्य आणि प्रशंसनीय प्रयत्न

'कविता : अष्टावक्र' अनुवाद आणि संपादन : श्याम विमल. इंद्रायणी साहित्य, पुणे १९८९, पृष्ठे १५+९८-११३.

**परीक्षणलेखक : ह. श्री. साने**

श्री. श्याम विमल महाराष्ट्रात, त्यातून पुण्यात राहून, पद्धतशीर मराठी शिकलेले हिंदी कवी आहेत. हिंदी 'काव्यप्रवृत्तींचा' मराठी वाचकांना परिचय अधिक जाणतेपणाने व्हावा अशा विधायक हेतूने त्यांनी आठ कवींच्या कवितांचा मराठीत अनुवाद केला आहे. ही खचितच आनंदाची बाब आहे. भारतीय भाषांमधील देवाण-घेवाण वाढावी-वाढवावी, म्हणजे भावनात्मक आणि राष्ट्रीय एकात्मता साधली जाईल, असे वेगळेपणाने सांगण्याची आवश्यकता नाही. डॉ. मिरजकर यांनी प्रस्तावनेत या गोष्टीचा ओझरता उल्लेख केला आहे. जी सामाजिक संस्कृती इंग्रजी माध्यमातून समजावून घ्यायचा प्रयत्न असतो, तो किती तुटपुंजा पडतो, हे अशा इंग्रजी माध्यम-विरहित भाषांतरांवरून सिद्ध होईल. अखिल भारतीय स्वरूपात प्रसार होण्याच्या दृष्टीने प्रत्येक साहित्य-प्रकाराचे प्रातिनिधिक स्वरूपात, संपादित का होईना, भाषांतर होणे अगत्याचे आहे. इंग्रजीशिवाय भारतीय भाषांमधील भाषांतरे होण्याची गरज वारंवार सांगितली जाते. परंतु श्याम विमल यांच्यासारखे आवर्जून होणारे प्रयत्न तुरळकच दिसतात. श्री. विजयकुमार चौकसे यांनी हरिवंशराय बच्चन यांच्या कवितांचे मराठीत भाषांतर केले आहे. 'कामायनी'चे भाषांतर झालेले ऐकिवात आहे आणि राजा बढे यांनी केलेले बिहारीच्या दोह्यांचे भाषांतर आहे. श्री. प. वि. जोशी यांनी बऱ्याच हिंदी कादंबऱ्यांचे मराठीत भाषांतर केले आहे. श्याम विमल आणि वरील अनुवादक यांच्यांत थोडा, परंतु महत्त्वाचा फरक आहे. वरील भाषांतरकार मराठी भाषी आहेत (चौकसे इतकी वर्षे महाराष्ट्रात आहेत, की त्यांना फक्त कागदोपत्रीच अमराठी भाषिक म्हणावे लागेल.) परंतु श्याम विमल केवळ मराठी शिक्षणासाठी इथे राहिले आहेत. त्यांनी केलेला काव्यानुवाद बऱ्यापैकी चांगला उतरला आहे. अर्थात अनुवादाच्या बाबतीत 'पूर्णांशांनी उतरणे' ही बाब अशक्य असते. त्यामुळे कवितेचा अनुवाद हा आणखीनच अवघड होऊन बसतो. याचे मुख्य कारण, म्हणजे कवितेचा अनुवाद ही एक वेगळी कलाकृती होण्याचा धोका या प्रक्रियेत असतो. परंतु श्री. श्याम विमल यांनी कटाक्षाने हा धोका टाळला आहे. कवितेचा अनुवादक हा कवीच असावा लागतो का ?

हा प्रश्न श्याम विमल यांच्या बाबतीत अप्रस्तुत ठरतो. कारण ते स्वतः कवी आहेतच. अर्थात हा प्रश्न विवादास्पद आहे. अशा परिस्थितीत अनुवाद प्रक्रियाच अवघड होऊन बसेल. कादंबरीचा अनुवाद कादंबरीकारानेच करायला हवा असे म्हटले, तर नवीन अनुवाद खूप कमी होण्याची शक्यता टाळता येणार नाही आणि प्रत्येक कादंबरीकारात अनुवादकाला आवश्यक असणारे गुण असतील, असेही नाही.

'कविता अष्टावक्र' या शीर्षकाबद्दल थोडंसं लिहिलं पाहिजे. 'अष्टावक्र' शब्दाचा उपयोग मराठीत प्रचलित सामान्य अर्थाच्या दृष्टीने फारसा चांगल्या संदर्भाने होत नाही. परंतु आठ निरनिराळ्या 'वक्रकविव्यापारांचे' दर्शन घडविण्याच्या अर्थाने 'अष्टावक्र' शब्दाचा उपयोग उचितच मानायला हवा.

ज्या आठ कवींची निवड केली गेली आहे, ते सर्व हिंदीतील नावाजलेले कवि-कवयित्री आहेत. त्यांना वेगवेगळी पारितोषिके देऊन निरनिराळ्या संस्थांनी त्यांचा गौरव केलेला आहे. आपापल्या वेगळेपणाने प्रत्येकाने हिंदी साहित्य समृद्ध करण्याचा कसून प्रयत्न केलेला आहे. म्हणूनच अशा प्रकारच्या अनुवादांमुळे मराठी साहित्यसुद्धा एका अर्थाने समृद्ध झालेले आहे, अशा अनुवादांची संख्या वाढवणे हा एक असा उपाय आहे, की ज्याच्या योगे आपण इंग्रजीच्या अनिवार्य झालेल्या मानसिक गुलामगिरीतून मुक्त होऊन स्वतंत्रपणे भारतीय भाषांमध्ये-साहित्यात-विहार करू शकू. म्हणून श्री. श्याम विमल यांच्या संपादित संकलनाचे हार्दिक स्वागत करतो, आणि त्यांचे अभिनंदनही करतो.

एक-दोन तांत्रिक बाबींचा उल्लेख करावासा वाटतो. हिंदीतील ज्या कविता निवडल्या आहेत, त्या मूळ कोणत्या पुस्तकातून घेतल्या आहेत आणि प्रत्येक कवितेचे मूळ शीर्षक काय आहे, याचा उल्लेख अगत्यपूर्वक व्हावयास हवा होता. यामुळे दोन फायदे झाले असते. एखाद्या कवीच्या उरलेल्या कविता मुळातून वाचण्याची इच्छा कोण्या वाचकाच्या मनात जागी झाली, तर त्याला तृप्तीचा मार्ग सापडला असता आणि दुसरा फायदा, म्हणजे अनुवादाच्या क्षेत्रात काम करणाऱ्या, अनुवादित साहित्याचा तुलनात्मक अभ्यास करणाऱ्या संशोधकांचासुद्धा प्रतिसाद मिळाला असता.

मराठीत प्रचलित अर्थाने विश्वास ठेवला जातो, धरला किंवा केला जात नाही. परंतु अनुवादकाने पृ. ९५ 'विश्वास करा' आणि पृ. ४७ 'धरा किंवा धरू नका आपण विश्वास' असा उपयोग केला आहे. मूळभाषा आणि अनुवादाची भाषा दोन्हींचे पुरेपूर ज्ञान-भान असणे ही अनुवादकाची गरज असते. 'सरळपणाने निघाले होते प्राण' (पृ. ४७) हा प्रयोगसुद्धा थोडासा चुकीचा वाटतो. हिंदीत प्राण शब्द अनेकवचनी आहे. पण मराठीत 'सरळपणाने प्राण गेला होता.' असा प्रयोग, किंवा अशी रचना व्हायला हवी. 'चकचकीत झाल्या कंपलेल्या डोक्यावरच्या मुकुटाच्या झालरी' (पृ. ४७) याबाबतीतसुद्धा– कवी कितीही 'निरंकुश' मानला, तरीही झालर कंपित झाली, का डोके? असा भ्रम होतोच. 'मीसुद्धा तर मूल आहे!' (पृ. ४७) ही रचना 'मी सुद्धा मूल

आहे, तर ! ' अशी हवी होती. ' प्रेताची जबानी ' या शीर्षकाबाबतही थोडासा घोटाळा झाला आहे. हिंदीमध्ये प्रेत याचा अर्थ मृतात्मा असा होतो. आणि मराठीत शव, शवाची जबानी अशा प्रयोगात कितीही विलक्षणता असली, तरी कवितेच्या आशयाशी ती जुळणारी नाही. यमापुढे आत्म्याची किंवा फार तर ' जीवाची जबानी ' असे शीर्षक अधिक चांगले झाले असते. ' बयान 'चा जबानी अनुवाद उत्तम आहे.

पृ. ४६ वरील एक-दोन वाक्यरचना अशाच ' गफलतीत ' झालेल्या वाटतात. ' थरथरला काहीसा हाडांचा मानवी सापळा ' ' थरथरला थोडासा मानवी हाडांचा सापळा '– ' थ 'चा अनुप्रास साधला असता आणि हाडांचा सापळा, लाकडाचा सापळा, असे भेदही झाले नसते. जरी मूळ कवितेत ' काँपा कुछ हाडों का मानवीय ढाँचा ' असा प्रयोग असला, तरीही मराठीच्या स्वभावानुसार शब्दशः भाषांतर उचित वाटत नाही. ' आ चुके हैं वे भी दयासागर करुणा के अवतार ' या ओळीचे भाषांतर ' आलीयत सगळी तीसुद्धा ओ दयाचे सागर कारुण्याचे अवतार ! ' बरोबर नाही. सागर (सागरा !), ( कारुण्याच्या अवतारा ! ) असा प्रयोग हवा होता. ह्या ठिकाणी ' मुद्राराक्षसा 'ला दोष देता येणार नाही, असे मला वाटते.

पुष्कळ दिवसांनंतर ! ( बहुत दिनों के बाद ) हा अनुवाद मूळ कवितेशी बराचसा निष्ठावान आहे. लय, आशय दोन्ही दृष्टींनी चांगला उतरला आहे. या ठिकाणीही काही प्रयोग खटकतात. ' धानकूटती किशोरियों की कोकिलकंठी तान ' याचे भाषांतर ' धान्यकूटत्या छान मुलींची कोकीळकंठी तान ' असे केले आहे. किशोरीचा अनुवाद निश्चितपणे ' छान मुली ' नाही आणि प्रस्तुतच्या अनुवादात छान हे विशेषण ' तान ' शब्दाचे असावे असे वाटते. या दृष्टीने ' ...कोकीळकंठी छान-तान ' अशी रचना अधिक औचित्यपूर्ण वाटते. मराठीत भोगणे आणि उपभोगणे या क्रियापदांचा उपयोग वेगळ्या छटांनी, वेगळ्या अर्थांनी होतो. दुःख, यातना, भोग भोगले जातात आणि सुख-आनंद उपभोगले जातात. ' या वेळी मी मनभरून भोगले, गंध–रूप, रस, शब्द, स्पर्श हे सगळे या भूवर ' या ठिकाणी छटा उपभोगण्याची आहे, फार तर अनुभविण्याची आहे. याच ओळीतील मुळातील ' साथ–साथ ' शब्द अनुवादकाने का सोडून दिला, ते कळत नाही. अनुभूतीची संमिश्रता सांगण्यासाठी कवीने मुळात ' गंध-रूप-रस-शब्द-स्पर्श सब साथ-साथ इस भूपर !' असे लिहिले आहे.

हिंदीत तुम आणि आप शब्दांचा वापर विशिष्ट अर्थाने होतो. मूळ कवितेत ' अज रोया या तुम रोए थे ? ' या प्रयोगात समानधर्मा कालिदासाशी जवळीक सांगण्यासाठी ' तुम 'चा उपयोग केला गेला आहे. परंतु अनुवादात मात्र ' आज रडला का तुम्ही 'मध्ये तुम्हीचा प्रयोग केला आहे. मराठीत तुम्हीने ती जवळीक अनुवादित होत नाही, जी हिंदीतल्या ' तुम 'ने होते. अजच्या ऐवजी आज छापले गेले आहे, तो मुद्रणदोष मानू या. ' त्या पुष्करावर्ती ढंगाचा, मित्र असून उडणाऱ्या ' या ओळीची मूळ ओळ ' उन पुष्करा-

वर्त मेघों का साथी बनकर उडनेवाले ' अशी आहे. थोडाफार हिंदी मराठीचे ज्ञान असणारा ही सांगू शकेल, की ' बनकर 'चा अनुवाद ' असून ' नक्की होणार नाही. या ऐवजी ' होऊन ' असा अनुवाद हवा होता. ' विरही यक्षाचं मन कंटाळलं 'ची मूळ ओळ ' विधुर यक्ष का मन जब उचटा ' अशी आहे. स्वाभाविकपणे विधुरसाठी विरही शब्द दिसतो आहे. विधुर आणि विरही शब्दांच्या अर्थच्छटा खूप वेगळ्या आहेत, हे पण तितक्याच स्वाभाविकपणे लक्षात येईल. असाच प्रकार ' कई दिनों तक चूहों की भी हालत रही शिकस्त 'चा अनुवाद ' किती दिवस उंदीरांची दशा झाली शिकस्त ' असा केला आहे. शिकस्तचा मराठी अर्थ पराकाष्ठा असा आहे आणि हिंदीत पराभूत असा आहे.

जी बाब नागार्जुन यांच्या कवितांच्या अनुवादासंबंधात वरती सांगितली आहे, ती थोड्या फार फरकाने इतरांच्या बाबतीतसुद्धा असू शकेल. अर्थात हा विचार जर हिंदी-मराठी कविता एकाचवेळी तुलना करीत करीत वाचल्या, तर उद्भवेल. फक्त मराठी वाचणाऱ्यां-साठी अनुवाद फारसा घोटाळ्यात टाकणारा नाही. एकूण पाहणी केल्यानंतर हा अनुवाद चांगला आहे, असेच मत होते. श्याम विमल यांचा प्रयत्न यशस्वी झाला आहे, यात शंका नाही.

नवीन कवितेच्या सगळ्या गुणवैशिष्ट्यांसकट मराठी अनुवाद सम्यकपणे परिणामकारक झाला आहे. डॉ. मिरजकरांची चर्चात्मक प्रस्तावनासुद्धा तुलनात्मक अभ्यास करू इच्छि-णाऱ्यांच्या दृष्टीने उपयोगी आहे; अनुवादकाचे धैर्य वाढविणारी आहे; किंबहुना अशा प्रयत्नांचे मराठी वाचकांनी उत्स्फूर्त स्वागत करावे, अशीच आहे.

थोड्याफार समजुती सुधारून घेतल्यास श्री. श्याम विमल मराठीभाषी नाहीत, असे सांगितले, तरच कळेल. ' पहाटे जेव्हा लोक जागे होतात, तेव्हा सगळ्या शहरात, एक दहशत सर पसरूनच जाते ' सर पडून जाते, पसरुन जात नाही. दिन आणि दिवस यांतला फरक ( पाणीदार दिन ), ' कवितेच्या वर हा तुमचा हात आहे किंवा दोरी 'मध्ये कविते-वर ( कवितेच्यावर ) हात आहे का (की ) दोरी– असे प्रयोग स्वाभाविक झाले असते. ' आपण माणूस आहोत किंवा नाहीत ' ( नाही-अधिक उपयुक्त ), ' कन्याकुमारी काठा-वर 'च्या ऐवजी किनाऱ्यावर पाहिजे. मराठीत समुद्रकिनारी प्रयोग होतो. तर नदीकाठी असा प्रयोग होतो ( नदीकिनारी असाही होतो ) पण समुद्रकाठी (काठावर) असा प्रयोग रूढ नाही. मराठीत ' मस्करी माजवते ' (पृ. ३९) असा प्रयोग नाही, अडचणी हटवल्या जात नाहीत. (पृ ३५ ) तर दूर केल्या जातात. ' कापलेलेयत पाय हवेचे, ती पण पहुडली छकड्यात, हळूहळू ' ( पृ. २७ ) पाय कापलेली हवा पहुडू शकणार नाही, मराठी ' पहुडणे 'ची छटा दुःखाच्या नाही, तर सुखाच्या संदर्भाने असते. [ मूळ हिंदी न पाहता ही खटकणाऱ्या बाबी आहेत या ] ' निसर्गाचा अनुराग-अंचळ घेतोय चंचल ' ( पृ. २२ ) असाच बुचकळ्यात टाकणारा अनुवाद आहे.

( पुढील मजकूर पृष्ठ ५० पाहा. )

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक ' मराठी अभ्यास परिषद ' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास, कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रक्कमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठवली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील, हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या तरी त्यांची आकारणी वर्गणीच्या दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद–वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले, हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

समान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिली आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला, तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवयाचा असल्यास शिवाय १०० रु ); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु. अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु. आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत चालेल, मराठी असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 040048/83

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

### इतिहासावरील प्रकाशने

| अ. क्र. | प्रकाशनाचे नाव | लेखक/अनुवाद | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. | महाराष्ट्रातील दप्तरखाने [ सुधारित द्वितीयावृत्ती ] | डॉ. वि. गो. खोबरेकर | ५२ |
| २. | महाराष्ट्रातील पुरातत्त्व | ह. धी. सांकलीया | १८ |
| ३. | सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख | म. म. वा. वि. मिराशी | ५५ |
| ४. | History & Inscription of the Satvahanas and the Western Kshatrapas. | -,,- | ७८ |
| ५. | Studies in Ancient Indian History. | -,,- | २८ |
| ६. | Portuguese Maharatta Relations [ डॉ. पी. एस. पिसुर्लेकर लिखित " पोर्तुगीज-मराठे संबंध " या पुस्तकाचा अनुवाद ] | श्री. त्र्यं. वि. पर्वते | ४३ |
| ७. | असे होते मोगल [ निकोलाय मनुची लिखित " Storia-Do-Mogor " चा अनुवाद ] | श्री. ज. स. चौगुले | ४५ |
| ८. | उत्तरकालीन मोगल खंड- १ [ डब्ल्यु. आयर्विन लिखित " Latter Mughals " चा. अनुवाद. ] | श्री. प्र. गो. टोंबरे | २८ |
| ९. | दुसरे महायुद्ध (सर विन्स्टन चर्चिल लिखित " The Second World War " चा अनुवाद | वि. वा. कुवाडेकर | ७१ |
| १०. | French Records Vol. I to IX [ मूळ फ्रेंच कागदपत्रांचे मराठी भाषांतर ] | डॉ. वि.ग. हटाळकर | ३१८ [ ९ खंडांची किंमत ] |

**साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने खालील केन्द्रांवर मिळतील :**

१. प्रकाशन व्यवस्थापक, शासन मुद्रण व लेखन सामग्री विभाग, चर्नी रोड, मुंबई ४०० ००४

२. व्यवस्थापक, शासन लेखन सामग्री आणि ग्रंथागार, शहागंज, गांधी चौक, औरंगाबाद ४३१ ००१

३. व्यवस्थापक, शासकीय ग्रंथागार, ५ फोटो झिंको पथ, पुणे ४११ ००१

४. व्यवस्थापक, शासन मुद्रण व ग्रंथागार, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१